# लाल झेंडा

( अमरकथा संग्रह )



— अनुवादक —

ग. कृ. गणेश जोशी

1944

मूल्य २ रुपये



“२० डिसेंबर १९४२ रोजीं, कलकत्त्यावर जपानी फॅसिस्टांनीं पहिली बॉंबफेक केली, त्यावेळीं न डगमगतां, धीमेपणानें, आपल्या फॅसिस्टविरोधी बाण्यास जागून, शौर्यानें, शहराचें दळणवळण चालू ठेवणाऱ्या, बहाद्दर ट्राम-कामगारांस—”

" फॅसिझम ही प्रतिगामी भांडवलशाहीची, शेवटची किंबहुना: प्राणांतिक तडफड आहे. साम्राज्यशाही, राष्ट्रवाद, वंशवाद, वसाहतींची नागवणूक, आंतर्राष्ट्रीय बँकभांडवलाकरवीं, दुनियेंतील श्रमजीविवर्गाचें रक्तशोषण, भ्रष्ट-बाजारी मन। ह्यींचे सर्व अमानुष प्रकार, यासारखीं, राजकारण व राजसत्तेंत भिनणारीं, सर्व जालिम विषें, व, वृथाभिमान आणि लाचारीच्या पशुकोटीस नेऊन भिडविण्यांत आलेल्या साऱ्या विचारप्रणालिका, दिवाळखोर भांडवलदार अक्कलवंतांनीं, हिटलर व मुसोलिनी, या गुंडांच्या सेवेला सादर केल्या आहेत: व त्यामध्यें, शतपटींनें भर घालून, हिटलर–मुसोलिनी, आज नंगा नाच घालीत आहेत.

सावध व्हा ! एकजात सर्व श्रमिक जनतेला, आवाहन करा; शतसहस्र–बाहु, कामगारवर्गाला पाचारण करा; कामगारवर्गाचें जें ब्रीद, तेंच आपले. हें जाणून, त्या ब्रीदाशीं जे इमानी राहिले आहेत, अशा सर्व लेखकांना व क्रांतिकारक कलावंतांना स्पष्ट बजावा: " फॅसिझमचें व आपलें जन्माचें हाडवैर आहे. आपण फॅसिझमशीं अखेरपर्यंत लढणार. व्होल्तेअरच्या उद्गारांची आठवण ठेवा—"

" या नरपशूंचा नायनाट करा ! "

रोमां रोलां.

"फॅसिझमचा, नायनाट करण्यासाठीं, आपण आटोकाट प्रयत्न केले पाहिजेत. आज फॅसिझमची, सर्वत्र झपाट्यानें वाढ होत आहे; पण आपण हें लक्षांत ठेवलें पाहिजे किं, फॅसिझम हें भांडवलशाहीच्या सामर्थ्याचें नव्हे, तर कमकुवतपणाचें लक्षण आहे. रणमैदानांत. कामगारांविरुद्ध, लुटारू मवाल्यांची टोळकीं उभीं करणें, आजच्या समाजांत मनुष्यप्राण्यास हालहाल करून ठार मारण्याच्या मध्ययुगीन पद्धति, घुसडून देणें, या गोष्टी, भांडवलशाहीचा हा अखेरचा जुगार आहे, मरणापूर्वीचा आंचका आहे, हे स्पष्ट दर्शवितात."

**क्लारा त्सेट्किन**

---

मी पूर्वीपासून "शांततावादी" होतों. लढाईची तर मला शिसारीच आली. जे मनुष्यप्राण्याच्या हानीला कारणीभूत झाले, त्यांची तर मला शरम वाटली. त्यांच्याबद्दल माझ्या मनांत कायमचा तिरस्कार उत्पन्न झाला.

—पण ज्यावेळेस आमच्या, भुकेलेल्या, अर्धनग्न व अनवाणी मजूर-शेतकऱ्यांनीं अभूतपूर्व विजय संपादन केला, ज्यावेळेस कामगारवर्गानें नवीन कामगारराज्याच्या बांधणींत, अतोनात संकटाच्या वेळीं, आपली बुद्धिमत्ता व कौशल्य प्रकट केलें, त्याच वेळीं ही निकराची लढाई अपरिहार्य आहे हें मला पटलें. ज्या वर्गाकरितां मी जीवन कंठितों आहे, व धडपडत आहे, त्या वर्गाविरुद्ध लढाई पुकारली गेल्यास, आज मी देखील एखाद्या सामान्य शिपायाप्रमाणें त्यांच्या बाजूनें लढेन. मला विजयाची खात्री आहे, म्हणून मी त्यास मिळेन असें नव्हे, तर सोवियत युनियनच्या कामगारवर्गाचें जें महत्तम व न्याय्य ध्येय आहे, तेंच माझें ध्येय व कर्तव्य होय.

**मास्किम गोर्की**

# फडकविण्यापूर्वी—

स्तालिनग्रादच्या अभूतपूर्व संग्रामापासून, लालसेनेनें, जगांतील साऱ्या जनतेचें लक्ष वेधून घेतलें आहे. असा एक दिवस सुना जात नाहीं, कि ज्या दिवशीं सोव्हिएतच्या लालफौजेनें विजय संपादन केला नाहीं. लेनिनग्राद ते सेवास्तोपोल, या अडीच हजार मैलाच्या, प्रचंड आघाडीवर लालसेनेनें आज तुफान आक्रमण सुरू केलें आहे. या महारथी चढाईचें सामर्थ्य कशांत सांठविलेलें आहे, हा प्रश्न साहजिकच डोळ्यासमोर येतो. या प्रश्नाचें उत्तर या कथासंग्रहांत आढळेल. रणांगणाच्या आघाडीवर लालसैनिक, तर पिछाडीवर, आबालवृद्ध सोवियत जनता धैर्यानें झुंजत आहे. लालसैनिक, गनिमि सैनिक, म्हातारे-कोतारे, बायका, लहानमुलें, व कलावंत, सारेजण जर्मन फॅसिस्टांना पिटाळून काढण्यासाठीं, कसे खडे राहिले आहेत, हें, "द्वेष", "लाल झेंडा", "गनिमि सैनिक", "म्हातारा शिपाई", "आई", "सतराजण" व "सफरचंदाचं झाड", या हृदयंगम कथांत आढळेल.

सोवियत युनियनच्या भूमिचें रणांगण बनलें असतां, तेथें काय साहित्य निर्माण होत आहे, हा दुसरा प्रश्न. सोवियत साहित्यिक आज रणांगणांवर जातीनें दाखल झाले असून, प्रत्यक्ष आढळणारे समरप्रसंग चितारण्यांत, व त्यायोगें जनतेचा खंबीरपणा वाढविण्यांत गुंग झाले आहेत. संग्रहांतील पहिली कथा, हिटलर-अधिकारावर आल्यानंतरच्या जर्मनींतील आहे. नाझीसत्तेच्या अमदानींतच, जर्मनींत गुप्त नाझी–विरोधी चळवळ असून, त्यांच्या तर्फे "लाल झेंडा" फडकविला जातो. शेवटची कथा सोवियत खलाशी लाल झेंड्याखालीं प्राणपणानें कसे लढतात हें दर्शविते. निकोलाय तिखोनोव हे खंदे सोवियत साहित्यिक असून, "लेनिनग्रादच्या कथा" हें त्यांचें सुप्रसिद्ध नवीन पुस्तक होय. "किकि"चे लेखक फ्रेडरिक वूल्फ, यांचीं पुस्तकें जर्मनींत जाळण्यांत आलीं. नाझीशाहीचा त्यांना प्रत्यक्ष अनुभव आहे. कांहीं दिवसांपूर्वी आलेल्या "डॉ.

मॅमलॉक" या उत्कृष्ट बोलपटाचे कथालेखक तेच होत. आज ते सोवियत युनियनमध्यें आहेत. "द्वेष"चे लेखक, मिखाईल शोलखोव यांची नव्याने ओळख करून देण्याची जरूरी नाहीं. "And quiet flows the Don", व "Virgin Soil upturned" या त्यांच्या कादंबऱ्या सुप्रसिद्ध आहेत. "द्वेषाचं समर्थन"चे लेखक इल्या एरेनबुर्ग. हे "Fall of Paris" या स्तालिन-पारितोषक मिळालेल्या कादंबरीचे लेखक होत. मिखाइल झोशेंको हे उपरोधगर्भ विनोदी लेखक असून, त्यांच्या लेखनशैलीची चुणुक. "एकमेकांच्या ओळखींत", दिसेल. वांदा वसील्येव्स्का, या पोलिश लेखिका असून यांचा "In the Hut" हा कथासंग्रह, व नुकतीच प्रसिद्ध झालेली कादंबरी "Rainbow", ही सोवियत युनियनमध्यें आवडीने वाचली जात आहे. गेल्या वर्षातील उत्कृष्ट कादंबरी, म्हणून तिला स्तालिन पारितोषक देऊन गौरव करण्यांत आला. हे सर्व साहित्यिक अव्वल दर्जाचे असून. त्यांच्या पुस्तकांवर, आज वाचकांच्या उड्या पडत आहेत.

असो. या पुस्तकाच्या बाबतींत, मॉस्को परभाषा प्रकाशनगृह, महाराष्ट्र ग्रंथभांडार, नॅशनल प्रिंटिंग ब्यूरोचे मालक श्री. गोडे व कामगार, व पुरोगामी चित्रकार श्री. आनिखिंडी या सर्वांचा मी अत्यंत आभारी आहे. छपाईतील दोषांकडे दुर्लक्ष करून, वाचक आजच्या सोवियत साहित्याचा आस्वाद घेतील, अशी आशा बाळगणारा,

**ग. कृ. गणेश जोशी**

लालसेना–दिन.
२३ फेब्रुआरी १९४४.
**मुंबई :**

| अनुक्रम. | | लेखक | पृष्ठ |
|---|---|---|---|

# लाल झेंडा : : : : १

पाऊस झिमझिम पडत असल्यानं सर्वांचीं तोंडं ओलीं झालीं आहेत; कपडे भिजून चिंब झाले आहेत, व हवा तर इतकी सर्द झालीय्, कि थंडीनं आतां दांतखीळ बसणार असं वाटूं लागलंय्. अर्नोल्डनं कोटाची कॉलर वर करून, दोन्ही हात खिशांत खोल खुपसले आहेत. त्याचं तोंड भिजून ओलं चिंब झालंय्. तो शहरांतून आला असून, रस्त्याचं नाकं नीट न्याहाळतां येईल अशा ठिकाणीं उभा आहे. त्यानं रस्त्यावर दूरवर डोळे किलकिले करून पाहिलं, पण त्याला कुणीही दिसलं नाहीं. कार्लचा तर मागमूसही नव्हता.

फिरतां फिरतां तो दिव्याच्या उजेडांत आला, व त्यानं मनगटावरच्या घड्याळावर नजर टाकली. कार्ल यायला अजून एक मिनिटाचा अवकाश होता. त्याला संशय येण्यासारखं असं कांहींच कुठं दिसत नाहीं. • पण कार्ल कुठं आहे ? तो आधीं आला असणं तर शक्य नाहीं ! थोड्या वेळापूर्वी तर कार्ल आला नसेलना ? तें कांहीं असो पण आपण कुणाचं लक्ष वेधून घेतां कामां नये ! एका जागीं उभं राहिलं, तर न जाणों कुणाला संशय यायचा. इकडे तिकडे

फिरायला लागलं पाहिजे. पण " कुठं चाललां ? " म्हणून जर कुणीं विचारलं, तर त्याला मी काय उत्तर देणार ? उत्तरच म्हणा आहे कुठं द्यायला ? तें कांहीं नाहीं, पचेल अशी कांहीं तरी सबब शोधून काढली पाहिजे. मध्यरात्र तर आतां उलटून गेलीय्. " घराची किल्ली हरवलीय्, म्हणून मित्राकडे झोंपायला चाललोंय्." वा: ! ही फार छान सबब आहे. " अरे हो: ! पण त्या मित्राचं नांव ? ह्यूगो कोल्झतर रिंगवेगमध्यें राहतो ? रिंगवेग २१, हा त्याचा पत्ता." " हां हां ! हे ठीक आहे; तसंच थेट जाऊन, पापेनस्ट्रॅसांत वळावं—"

अर्नोल्ड कारखान्याच्या भिंतीजवळ उभा आहे. अजून कार्ल येण्याचं कांहीं चिन्ह दिसत नाहीं. अर्नोल्डनं आपली चाल थांबविली.

" हॅलो, अर्नोल्ड ! " हळूच कुणी तरी त्याचं नांव उच्चारलेलं त्याच्या कानीं पडलं. तसं पाहिलं तर बोलणाऱ्याचा आवाज अगदीं हळू होता, पण अर्नोल्डचे कान तिखट असल्यानं, त्याला तो तावडतोब ऐकूं आला. कार्ल फाटकाजवळ उभा होता. अर्नोल्डनं पुढं सरकून, त्याच्याशीं हस्तांदोलन करतांच त्याच्या तोंडावर हास्य चमकलं.

" सगळं ठाकठीक आहे ? "

" हो."

" सगळ्या वस्तू आणल्यास बरोबर ? "

" शुऽऽऽ ! तुला आवाज येतोय कां ऐकूं कसला तरी ? " असं म्हणून कार्लनं, अर्धवट उजेड दिसणाऱ्या, रखवालदाराच्या खिडकीकडे पाहिलं.

अर्नोल्डला दूरवर कसले तरी आवाज ऐकूं आले.

" आतां फक्त अर्धा तास आहे," कार्ल हळूहळू हलक्या आवाजांत बोलत होता. " तो बघ रखवालदार, त्याची गस्त चालू आहे. बारा, फार फार म्हणजे पंधरा मिनिटांत तो परत येईल. भलतंच दैव उघडलंय् आपलं ! तो, आपल्या-बरोबर कुत्रेदिखिल घेऊन गेलाय् ! मी हें, बरोबर आणलं होतं, म्हटलं वेळ पडली तर असावं म्हणून, पण याची कांहीं जरूर पडेलसं वाटत नाहीं, सर्व कांहीं ठीक आहे."

"कार्ये, या हवेनं आपल्याला अगदीं सतावलंय् नाहीं? काय हा पाऊस! आपल्या प्रमुखानं मला शेवटीं बजावलंय्, फारच धोक्याचं वाटलं, तर ही कल्पना सोडून द्या."

कार्लेनं मान हलवली व आपले टपोरे डोळे अर्नोल्डकडे वळवले. "कल्पना सोडून द्यावयाची? मग हा इतका खटाटोप उगाच केला वाटतं?"

"छेः! छेः! तसं नाहीं रे! त्याच्या म्हणण्याचा अर्थ इतकाच, कीं, हवा जर फारच वाईट असली तर हें धाडस करूं नये,"

कार्लेनं निश्वास सोडला. "अस्सं! मला वाटलं कि तूं म्हणणार, सगळाच कारभार आटोपला, म्हणून! सगळं कसं अगदीं यंत्रामारखं सुरळीत चाललंय्."

थोडावेळ, त्या खिडकीकडे पहात, व चाहूल घेत, ते तसेच अंधारांत उभे राहिले. खरं म्हटलं, तर ते कांहीं क्षणच उभे होते, पण त्यांना ते युगाप्रमाणं भासले. कारखान्याची काळी कुट्ट, उंचच्या उंच चिमणी, त्यांना समोर दिसत होती. दोघांचेंही लक्ष तिच्याकडे गेलं. अर्नोल्डच्या तोंडावर कसलीच भावना उमटली नाहीं, पण कार्लेच्या मुद्रेवर मात्र स्मित झळकलं. तो जणूं. चिमणीला उद्देशून, स्वतःशीं पुटपुटत होता "थांब, एकाद्या मांजरासारखा तुझ्यावर झरझर चढतों, आणि उद्यां...हजारों जण तुझ्याकडे आश्चर्यानं पहात बसतील."

त्यांना पावलांची चाहूल लागली, रखवालदार, गस्त घालून परत येत होता. कुणाशीं तरी तो बोलत असावा. "कोण बरं असेल त्याच्या बरोबर.? हात्तिच्या? कुत्र्यांशीं.! ते होते ना त्याच्या बरोबर." तो खोलींत गेला व स्टोव्हपाशीं जाऊन बसला.

"चला उठा," असं म्हणत कार्ले उठला. त्याच्या हातांत बादली असून. अर्नोल्ड त्याच्या मागोमाग जात आहे. सगळं अगोदरचं ठरलं असल्यानं, प्रश्न विचारण्याची जरूरच नाहीं. आपण काय करायचं, हें दोघांनांही पुरं ठाऊक आहे.

अर्नोल्डच्या मनांत विचार आला, त्याला म्हणावं "कार्ले, ती बादली खालींच राहूं दे. इतकी जड बादली घेऊन तूं वर कसा चढणार?" पण मग त्यांचं त्यालाच वाटलं, कीं आगाऊ सगळं अगोदर ठरलंय्, मग आतां शेवटच्या क्षणाला, त्यांत फेरफार करतां कामां नये.

कार्लच्या अंगात हिरवा गंजीफ्राक असून, त्यावरून, एक जाडजूड, रुंद चामड्याचा पत्रा पट्टा बांधला आहे. त्याच्या कमरेला काय लटकतंय, म्हणून अर्नोल्डनं जवळ जाऊन पाहिलं, तों, खाटीक वापरतात तसा मोठा, आंकडा होता. कार्लनं लाल झेंड्याची घडी करून, बहुत करून तो गंजीफ्राकच्या आंत गुंडाळला असावा.

हळूहळू त्यांनीं रस्ता ओलांडला, व कारखान्याच्या भिंतीजवळ, मोडक्या तोडक्या सामानाचा ढीग पडला होता तिथं आले. अर्नोल्डनं सभोंवर नजर फिरवली. सर्वत्र काळोख पसरला असून, चिटपाखरुं दिसत नव्हतं. कार्लनं आजू बाजूला न पाहतां, भिंतीची ठराविक जागा पकडली, बादली खालीं ठेवली, व हळूच म्हटलं " हं, अर्नोल्ड, आतां मला वर चढव पाहूं. "

त्यांनी या कवाईतीची, आधींच संवय केली होती. त्यामुळं ते बरोबर साधलं, आणि त्यांतून या महत्त्वाच्या प्रसंगीं ते कां फसावं ! तरी, अर्नोल्डचे पाय लटपटायला लागले, आपण घाबरलों आहों या जाणिवेनेच कीं काय, त्याला अधिकच धडकी भरायला लागली. पण कार्लच्या तोंडावरून मात्र तो शांत व धिम्या स्वभावाचा दिसत होता. त्याची घाबरगुंडी उडाली नव्हती. त्याचा निश्चयसुद्धां, त्याच्या हाताच्या पकडीसारखा, घट्ट—वज्रकठोर होता. तो अर्नोल्डच्या खांद्यावर उभा राहिला होता. थोड्या वेळानं तो हलक्या सुरांत म्हणाला. " हं अर्नोल्ड, आतां बादली वर दे पाहूं. "

अर्नोल्डच्या मनांत आलं, आतांच त्याला सांगावं, " कार्ल, अरे कसली बादली, नि कसलं काय, खालीं उतरून घरीं जा पाहूं, " त्याचा एक हात भिंतीवर होता दुसऱ्या हातानं त्यानं बादली उचलली. त्याला वाटत होतं, त्यापेक्षां बादली बरीच जड होती. " अरे बापरे ! एवढी जड बादली घेऊन, कार्ल त्या उंच चिमणीवर चढणार ! त्या बादलीच्याच वजनानं तो खालीं ओढला जाईल. छे: ! निव्वळ आत्महत्त्या आहे ही. "

" कार्ल, फारच जड आहे बादली. ती खालींच राहूं दे ! "

" कां ! स्वारीची हंबरडी उडालेली दिसते. ते कांहीं नाहीं, चल ती बादली दे वर. "

अर्नोल्ड बादली उचलण्यासाठीं खालीं वांकला खरा, पण ती उचलायला त्याला होती नव्हती तेवढी सारी शक्ति खर्च करायला लागली. तो थोडक्यांत वांचला, नाहींतर कोलमडून खालीं पडला असता. अर्नोल्डच्या खांद्यावर इतका जोर पडला कीं, तो कळवळून ओरडण्याच्या बेतांत होता.

बादली तर भिंतीपलीकडे गेली. कार्ल उभा राहिला. अर्नोल्डच्या मनांत सारखें घोळत होतें, "सगळें कांहीं ठीक पार पडलें, म्हणजे मिळवली." कार्ल भिंतीवर चढून गेल्यावर, अर्नोल्डला कपसेंच वाटून, त्यानं रस्ता ओलांडला, व एका दाराच्या पायरीशीं उभा राहून, छपरावर रांगणाऱ्या कार्लच्या काळ्या आकृतिकडे पाहूं लागला. वास्तविक हें त्यांनी आगाऊ ठरविलेल्या योजनेविरुद्ध होतें. हाताच्या मागच्या बाजूनं, त्यानं आपलें घामानं डबडबलेलें कपाळ पुसलें. आपल्याला इतका कमालीचा घाम कां सुटत आहे, याचं त्याला आश्चर्य वाटलें.

भिंत व छप्पर यांवरून, चिमणीवर कसें चढायला मिळेल, याचा कार्लनं जणूं अभ्यास करून ठेवला होता. हा प्रयोग त्यानं कल्पनासाम्राज्यांत, कित्येकदां करून पाहिला होता. चिमणीवरील, लोखंडी शिडीची एक पायरी मोडली असून, पुष्कळशा खिळखिळ्या झाल्या असतील हें मुद्दां त्याला माहित होतें. कारखान्याची ही चिमणी जुनी झाली असून, आज कित्येक वर्षे ती निरुपयोगी म्हणून, पडून राहिली होती.

नुसतें दिवसभर नव्हे, तर रात्रीसुद्धां, चिमणीवर चढण्याचे विचार कार्लच्या डोक्यांत घोळत असत. एकदां तर त्याला असें स्वप्न पडलें, कीं, "आपण चिमणी चढून वर गेलों व झेंडा लावल्याबरोबर हात हालविला. पण खालीं, धगधगणाऱ्या भट्टीची ज्वाला, जणूं पृथ्वीच्या पोटांतील आगीसारखी वर भडकत होती. खालीं सर्व शहर शांतपणं घोरत पडलें होतें. इतक्यांत, आपला हात निसटला व आपण खालीं पडलों......इतक्या वेगानं, जमिनीवर आदळायला खालीं येत होतों !" वातावरणसुद्धां घट्ट झाल्यासारखें वाटलें त्याला.—त्यानं तोंड उघडून श्वास घेण्याचा प्रयत्न केला—आणि शेवटीं तो जागा झाला. त्याला अत्यंत भीति वाटली. आपण जमिनीवर आहों अशा भावनेनं, तो

बिछान्यांत निश्चल पडून राहिला. कालें, स्वप्नांवर विश्वास ठेवणारा नाहीं हे बरं आहे.

आतां त्यानं लोखंडी शिडीची पहिली पायरी हातानं घट्ट धरली असून, त्याचं लक्ष उंच चिमणीकडे गेलं आहे. तेव्हां आतां मात्र विचार केला पाहिजे.

कालें, आत्मविश्वासानं वर चढूं लागला. चढणं हें चिकाटीचं व दमाचं काम आहे. वर चढत असतांना, मनांत चलबिचल होतां कामां नये, घाबरतां कामां नये, धीरानं व सावकाश चढलं पाहिजे. तो एकेक पायरी वर चढत होता. त्यानं कमरेला अडकविलेली बादली खरोखरीच जड असून, ती त्याला खाली खेंचीत होती. पण जरा थांबा. आतां थोडयाच वेळांत, हें बादलीचं ओझं कमी होणार आहे. हें जर बादलीचं ओझं नसतंना, तर झपझप वर चढून जाणं, म्हणजे एक मोठा गंमतीचा खेळच होता.

कालें सावकाश चढत आहे, वरच्या पायरीवर पाय ठेवायच्या आधीं, ती मजबूत आहे किं नाहीं, हें तो हातांनीं चांचपून पहात आहे, व चुकूनसुद्धां तो दोन्ही हातांनीं एक पायरी धरीत नाहीं. त्याच्या मनांत एकसारखे अर्नोल्डचे विचार येत आहेत. कां कुणास ठाऊक, अर्नोल्डला आज अत्यानंद झालेला दिसत होता, पण त्याबरोबरच तो खालीं भीतीनं थरथरत होता. वास्तविक, अर्नोल्ड हा नेहमीं स्थितप्रज्ञाप्रमाणं वागे. कालेंला त्याची आठवण झाल्यावर हंसू आलं.

मोडक्या पायरीशीं जाऊन पोंचायला आणखी किती बरं वेळ लागेल ! त्यानं जरा वेळ थांबून वर चिमणीकडे पाहिलं. पण काळोखांत, त्याला ती पायरी कुठं दिसेना. त्यानं खालीं नजर फेंकली मात्र, नकळतच त्याच्या हातांनीं पायरी घट्ट धरून ठेवली. तो आतां बराच उंच चढून आलाय्. छपरांच्या किती तरी वर ! वरून रस्ते अगदीं लहान लहान दिसायला लागले आहेत. हर्नरलॅड-स्ट्रॉस तर फूटपट्टीनं आंखलेल्या रेषेसारखा दिसत आहे.

आतां जर माझा हात निसटला तर.........! छट् ! वर चढलंच पाहिजे ! पण काय ही शिंची जड बादली ! चला वर !

कार्ल वर चढायला लागला. नसनसंत भयानक विचार त्याच्या डोक्यांत भिरभिरायला लागले. आतां जर कां माझा हात सुटला तर साराच कारभार आटोपला. छट्! हात सुटला?... त्यानं हे दुष्ट विचार पिटाळून लावायचा प्रयत्न केला, पण छे! ते पुनः डोक्यांत शिरले, हातापायांत उतरले, रक्तांत पसरायला लागले,...त्याचं सर्वांग थरथरायला लागलं....पायांखालची पायरी घसरते कि काय असं त्याला वाटूं लागलं.

कार्ल सपासप वर चढूं लागला जणूं कांहीं यामुळं ते भीतिदायक विचार पळ काढणार होते...कि वर सुरक्षितता साठविलेली होती! आतां इथंच बादली अडकवून ठेवावी. कां? हें बरंच उंच आहे. बादली काढली कि, किती वर चढतां येईल? ती बादली म्हणजे जणूं एकादा लांबलचक हातच त्याला खालीं ओढीत होता. इतक्यांत त्याच्या हाताला पायरीऐवजीं मोकळी जागाच लागली. प्रथम त्याला एकदम भीति वाटली पण नंतर त्याचं समाधान झालं. शेवटीं तो मोडक्या पायरीजवळ आला एकदांचा!

कमरेच्या आंकड्याला अडकविलेली बादली काढून कार्लनं पायरीला अडकविली. क्षणमात्रच तो थांबला, त्यानं जरा अंग मोकळं केलं, आणि दीर्घ निश्वास सोडला. शेवटीं पोंचलों एकदांचे! किती तरी वेळ चढतोंय् मी! छेः तीन फार तर चार मिनीटं झालीं असतील! आणखी वेळ लागला असेल! किती तरी तास झाले असतील असं वाटतंय्य.

इतक्या उंचीवर वारा किती सोसाट्याचा सुटला आहे! आतां कुठं अर्धी शिडी चढून झाली आहे. अर्नोल्डला मी दिसत असेन कां? तो स्वतःशींच विचार करूं लागला. छेः! शक्यच नाहीं. पाऊस थांबला हें एका अर्थी फार छान झालं. पण लोखंडी पायऱ्या भिजल्या असून बुळबुळीत झाल्या होत्या. थांबा, थोड्या वेळानं तो त्या आणखी निसरड्या करून ठेवणार होता. हें काम करायचं आहे, हें तो विसरण्याच्या बेतांत आला होता. आतां जर एकाद्या नाझीचं लक्ष त्याच्याकडे गेलं, तर कामच झालं! क्षणार्धांत ते लांडग्यासारखे खालीं जमून, आपलं भक्ष्य म्हणून कार्लकडे रोखून पाहतील. अशा वेळीं वरून बेधडक उडी मारलेली काय वाईट!

एकदम खालीं उडी मारायची ? पुन्हां नको तो विचार आलाच. पण उडी मारणं कांहीं मोठंसं दुःखदायक नाहीं. एका—कशाला अर्ध्या सेकंदाचे काम—हात सोडून दिला कि झालं... ...

कार्ले स्वतःशींच मोठ्यानं म्हणाला " कां. माझ्या शरीरातील नसा. जहाजावरील दोरखंडासारख्या मजबूत आहेत. त्या कांहीं अशा तुटणार नाहींत. आणि ही शिडी चढून जाणं म्हणजे. " क्या बडी बात है ?" यावर मीच कांहीं पहिला माणूस चढत नाहीं—" इतक्यांत त्याला त्या भयानक स्वप्नाची आठवण झाली. कार्ले स्वप्नांसारख्या समजूतीवर विश्वास ठेवणारा नाहीं हें फार चांगलं आहे !

ती मोडक्या पायरीची रिकामी जागा ओलांडून कार्ले वरवर चढूं लागला. बादलीचं जड ओझं कमी झाल्यानं आतां चढणं सोपं झालं आहे. खालीं पाह्यचं नाहीं असं त्यानं ठरवलं पण व्यर्थ ! खालीं पाहाण्याचा मोह त्याला आवरत नाहीं, कारण आपण किती उंच चढून आलों. हें जाणण्याची त्याला उत्सुकता आहे ना ? अरे बापरे ! ही शिडी संपणार तरी कधीं ? त्यानं वर पाहिलं मात्र. त्याला वाटलं कि " चिमणी खात्रीनं वाढायला लागलीय् !" पण काम हें झालंच पाहिजे. चला ! झपझप पाय उचला ?

कार्ले वर वर चढूं लागला. जोराचा वारा त्याच्या भोंवतीं भिरभिरत होता. खरोखरच हें वारं अगदीं दुष्ट नि निष्ठुर होतं. चिमणी हलत आहे असा त्याला भास झाला ! नेहमींच कां ही अशीं हलते ?

कार्ले सर्दच झाला व थांबला. अरे, ही चिमणी तर चक्क हालायला लागली ! हेलकावे खाऊं लागली ! अगदीं खरंच, चिमणी हालायला लागली. त्याला कांहींच समजेना ! नेहमीं कां ही अशीं हलते ?

परत खालीं उतरण्याचा त्याला अनावर मोह झाला. मागं फिरायचं ? कांहींएक न करतां मागं फिरायचं ? आणि अर्नोल्ड ? आपले इतर मित्र ? मी काय भेकड आहे ? काय माझ्या कुवतीबाहेरचं कार्य मी अंगावर घेतलं आहे ?

छी : ! काय घाणेरडे विचार माझ्या डोक्यांत येताहेत ? चला, चला. वर चला ? मला खालीं पहातांच कामा नये ! वर पाहिलं पाहिजे ! सारखं चढत

राहिलं पाहिजे ! कालेनं समोरच्या चिमणीवर नजर लावून वरवर चढायला सुरवात केली !

......वर—वर—वर... उंच... अधिक... उं...च ! पहिल्या प्रथम त्याच्या डोक्यांत सहज कल्पना आली, नंतर ओंठ पुटपुटूं लागले व शेवटीं, तो मोठ-मोठ्यानं, वीरश्रीनं भरलेलं जर्मन गाणं गाऊं लागला.

त्या गाण्यानं त्याच्यांत धैर्य संचारलं. गाण्याच्या भरांत आपण किती उंच चढतों आहोंत याचा त्याला विसर पडला. त्याला चढण्यांत मजा वाटायला लागली... काले आणखी उंच... उं...च चढला. आतां, त्याच्या आंगाला गार वारा, झोंबत नव्हता, डोळ्यांना चिमणी हालतांना दिसत नव्हती, कि डोक्यांत, भयप्रद विचार येत नव्हते. त्याचे ओंठ गाणं गात होते व पाय आपलं काम करीत होते.

पुनः एकदां त्याच्या हाताला मोडक्या पायरी रिकामी जागा लागली. पण—

—पण ती रिकामी जागा नव्हती. तिथं शिडीच संपली असून तें चिमणीचं टोंक होतं.

त्यानं सावकाश काळजीपूर्वक रितीनं चिमणीची कडा चांचपून पाहिली. चिमणीवरचं विटांचं बांधकाम, त्याची कल्पना होती त्यापेक्षां अधिक मजबूत होतं. आतां मात्र शेवटच्या क्षणाला, धांदल करतां कामा नये, डोकं थंड ठेवून काम केलं पाहिजे. काले सावकाश वर चढला, त्यानं चिमणीचा कांठ हातांनी घट्ट धरला व पलिकडे पाय टाकून तो चिमणीवर बसला.

सरते शेवटीं तो वर चढला एकदांचा ! खालीं उतरणं काय, सोपं काम आहे. कारण आतां रस्ता आपल्या ओळखीचा झाला आहे. पण मी इथं चिमणीवर उभा असतांना, चिमणीसारखा जर हेलकावे खायाला लागलों तर...? पुनः ते वेडे विचार पिसाळले ! मर्दगड्या, आपलं काम छातीठोकपणानं कर व खालीं उतर.

चिमणीवर बसल्यावर कालेला अत्यानंद झाला असून ती जागा त्याला कमालीची सुरक्षित वाटत होती—कारण त्यानं हातीं घेतलेलं काम आतां सफल

होणार होतं—लाल झेंडा आतां डौलानं फडफडणार होता! आंगाभोंवती लपेटून घेतलेला लाल झेंडा सोडून त्यानं वीजप्रतिबंधक खांबाला बांधण्यास आरंभ केला. त्यानं खालीं वरतीं, अशा रितीनं झेंडा बांधला कि त्याचा गुंडाळा न होतां तो मोकळा होऊन, डौलानं फडफडूं लागला.

काळेला नेहमीं वाटे कि, आपण अगदीं थंड डोक्याचे आहोंत, पण खरो-खरच तो शांत डोक्याचा आहे—मात्र मधून मधून, वरून उडी मारण्याचे राक्षसी विचार, त्याच्यांत डोकावतात. तो मुद्दाम खालीं पहात नाहीं, त्याची नजर लाल झेंड्यावर एकवटली आहे...अशा स्थितींत काळेची एकटी एक आकृती रात्रींच्या वेळीं—त्या उंच चिमणीच्या अगदीं टोंकावर बसली आहे!

आतां लवकर खालीं उतरलं पाहिजे. सर्व शहराला तो लाल झेंडा आतां स्पष्ट दिसत असला पाहिजे. तेव्हां आतां पटापट पायऱ्या बुळबुळीत करायला लागलं पाहिजे. त्याच्या मनांत विचार आला. "अर्नोल्डला मी खालून दिसत असेन का? त्याचे पाय थरथरायचे थांबले असतील का?" झरकन् त्यानं, मनोरे, भट्ट्या, कोळश्यांची राशी, इमारती, यांवरून एक धांवती नजर फेंकली, पायानं हळूच झेंडा सारखा केला, आणि खालीं उतरण्यासाठीं पहिल्या पायरीवर पाऊल टेवलं.

खालीं उतरणं हें नक्कीच सोपं आहे. त्याला पुनः गावेंसे वाटायला लागलं, पण मघाप्रमाणं, भीतिमुळं नव्हे तर विजयानंदानें! बिकट काम तर सफल झालं! काळे पुनः मोडक्या पायरीशीं येऊन पोंचला. तिथं बादली अडक-विलेली होती. बादलीच्या कडीला बांधलेला रुमाल सोडून त्यानं बादलींत बुचकळला एका हातानं पायरी धरून, दुसऱ्या हातानें, बादलींत तयार केलेली साबणाची चिकट बुळबुळीत खळ, त्यानं पायरीला फांसायला सुरवात केली. झेंडा काढायला कुणी वर तर चढूं दे, कि त्याची हड्डी नरम झालीच समजा!

आंगात भूत संचारल्यासारखं काळेचं काम चालू होतं. पायऱ्यांवर साबणाचे लहान लहान तुकडे चिकटले होते. बादली हळू हळू रिकामी होत होती. बाहेर हवेंत इतका गारठा होता, तरी काळे घामानं निथळत होता, त्याचे कपडे आंगाला चिकटले होते.

त्यानं रिकामी बादली कमरेच्या आंकड्याला लावली. छपरावर उडी मारतांना त्याला अतिशय आनंद झाला होता. काम तर सफाई पार पडलं! सगळ्या अडचणी ओलांडल्या! कार्लनं कामाचा विचका केला नाहीं.

त्यानं भिंतीवरून वांकून पाहिलं. आगाऊ ठरल्याप्रमाणं तिथं अर्नोल्ड उभा होता. कार्लनं, बादली त्याच्या हातांत दिली. व भिंतीवरून उडी मारून साव-काश खालीं उतरला. अटकून पण भेदरटपणानं नव्हे. दोघांनी रस्ता ओलांडला हर्नरलेंडस्ट्रॉसशीं आल्यावर अर्नोल्डनं हलक्या आवाजांत म्हटलं. " वाः! फारच छान!"

" किती वेळ लागला एकंदर!" कार्लला मध्यां हे हवं होतं.

" सुमारें आठ मिनिटं!"

" आठ मिनिटं! काय आठ मिनिटं! छट्! तुझी कांहीं तरी चूक होत असली पाहिजे. त्यापेक्षां किती तरी अधिक वेळ खात्रीनं लागला असला पाहिजे."

कांहीं एक न बोलतां. ते दोघ मुकाट्यानं चालले आहेत. अर्नोल्डच्या हातांत रिकामी बादली आहे.

" कायरे. कार्ल. खरं सांग तूं वर गाणं गात होतास!" कार्लनं मान हलवून हंसत म्हटलं...... " हो!"

" कां!"

" मी घाबरलों."

" काय! घाबरलास! खरंच! अच्छा. गुड् नाईट्. म्हातार बुवा!"

" गुड् नाईट."

कार्लनं, घरांत शिरायच्या आधीं, कारखान्याच्या चिमणीवर फडफडणाऱ्या लाल झेंड्याकडे, एकवार पाहिलं. अगदीं उंचावर शेवटीं, चिमणीच्या टोंकाला. काळोख्या रात्रीं देखील, लहानसा लालझेंडा. वाऱ्यावर फडफडतांना स्पष्ट दिसत आहे!

# मूल जन्मास येतं : : : : २

धांवत सुटल्यानं, तो धापा टाकीत होता, व गोंधळून गेल्यानं त्याच्यांत चिडखोरपणा आला होता. तो बोलू लागला, " ही जागा शोधून काढतां काढतां माझ्या नाकीं नऊ आले. बाहेर अंधार तर इतका पसरला आहे, कि स्वतःचं घर ओळखायची मारामार !" जरा वेळ थांबून त्यानं टोपी झाडली. किती तरी बर्फ सांचलं होतं तिच्यावर !

" काय हो, हेंच कां बाळंतपणाचं हॉस्पिटल ?"

" होय ! कां ?"

" कां ? काय झालंय् म्हणतां ? अहो रस्त्यांत एक बाई बाळंत होतेय् हे झालंय् !"

" बरं, पण तुम्ही कोण ?"

" मी रस्त्यानं जाणारा कामगार. रात्रपाळी संपवून मी घरीं चाललों होतों ... पण चला, लवकर चला ... मी दाखवतों तुम्हांला ... काय तरी भलताच

प्रसंग ?...पाहातों तों डोळ्यासमोर हा प्रकार ! आसपास चिटपांखरूसुद्धां नव्हतं. बरं त्यावेळीं मी तरी काय करणार ?... मी कांहीं सुईण नव्हे."

थोड्या वेळानं तो कामगार व नर्स इरिना अशी दोघं बर्फ तुडवीत चालली होतीं. पहावं तिकडे काळोख ! सभोंवतालचीं घरं, उघड्यानागड्या मुळक्यांप्रमाणं भयाण दिसत होतीं. दूरवर डोळे विस्फारून पाहिलं तरी, दिवा दिसेल तर शपथ, रस्त्यांत, सर्वांगाला झोंबणारा थंडगार वारा सोंसाट्यानं वाहून सर्वत्र हिमकण उधळीत होता. तशांतच रस्त्यांतून स्काऊटसूच्या काळ्या आकृति हालतांना दिसत. थंडीनं पार गारठून गेल्यानं, ते जलद चालण्याची कोशीस करीत होते.

कां कुणास कळे, इरीना एकदम मटकन खालीं बसली. दुरून येणारा क्षीण आवाज त्यांच्या कानावर पडल्याबरोबर त्यांनी डोकं वर उचलून सभोंवार पाहिलं. नाक्याजवळच प्रचंड लालभडक ज्वाला एका मागोमाग एक, उसळत होत्या, व मेघगर्जनेसारखा कडकडाट सर्वत्र होत असून, कानठळ्या बसवीत होता. आवाजासरशीं घरांच्या छपरांवर सांचलेले बर्फाचे लहान लहान तुकडे खळ्कन् रस्त्यावर फुटत होते.

"त्या बापडीला फटका बसला नसला म्हणजे योगायोगच म्हणायचा"... इरिना काळजीपूर्ण स्वरांत उद्‌गारली.

"छे: ! त्याची नको काळजी. ती रस्त्याच्या दुसऱ्या बाजूला आहे त्या तिकडे...पलीकडे आहे ती." तो आश्वासनच देत होत होता जणूं...

"तो दिव्याचा खांब दिसतोय ना ? त्याच्यापुढं आहे ती. बरं, मी जातों आतां. आज रात्रभर तोफांचा भयंकर भडिमार चालू आहे...आणि उगीचच्या उगीच, घरीं जाऊन पोंचायच्या आंत मरायची माझी तयारी नाहीं."

इरिना ही त्या बाळंतपणाच्या हॉस्पिटलांत, रिसेप्शनरूमध्यें काम करणारी नर्स असून तिचं नर्सिंगचं शिक्षण पुरं झालं नव्हतं. परंतु, अशा आणीबाणीच्या प्रसंगी, तिला रात्रीच्या वेळीं काळोखांत धडपडत, रस्ते धुंडाळून, त्या बाईला शोधून काढून, तिचं बाळंतपण करावं लागलं. आतां प्रत्येक घडी

मोलाची होती. बरं, अशावेळीं तिच्या मदतीला तरी कोण येणार ? मध्यरात्रींची वेळ; गार वारा सुटलेला, नि सर्वत्र हिमवर्षाव सुरू ! हिस्स्–हिस्स्...क्लँग–क्लँग–करीत डोक्यांवरून तोफांचे गोळे उडत होते. या बर्फाच्या ढिगाऱ्याहून तिकडे, अशी इरिनाची सारखी धांवपळ चालू होती. जरा वेळ थांबायचं, कान टवकारून कण्हण्या विव्हळण्याचा आवाज ऐकूं येतों कां. याचा कानोसा घ्यायचा. पुनः धांवायचं !

उजव्या बाजूनं तिला कण्हण्याचा आवाज आला मात्र, तीरासारखी त्या बाजूला धांवली. मघांच्या त्या कामगारानं सांगितल्याप्रमाणं, दिव्याच्या पलीकडील बाजूला, घराच्या बंद लोखंडी दाराशीं, भिंतीला टेंकून तीं बाई बर्फात कुडकुडत बसली होती. तिच्याचवळ गेल्याबरोबर इरिना गुडघे टेंकून. खालीं बसली, व तिनें तिचा हात आपल्या हातांत धरला. किती उष्ण व थरथरत होता तिचा हात !

खरोखरच, त्या बाईला हॉस्पिटलांत नेण्यांत आतां कांहीं अर्थ राहिला नव्हता, तिची अवस्था नेण्याच्या पलीकडे गेली होती. तिला प्रसूति-वेदना तर केव्हांच सुरू झाल्या होत्या. भर हिवाळ्याच्या, काळयाकुट्ट मध्यरात्रीं. डोक्यावरून जर्मन तोफांचे गोळे भिरभिरत आहेत, व ते फुटल्यानं एकदम उजेड चमकत आहे अशा अद्भुतरम्य प्रसंगी बर्फात. ती मुलाला जन्म देत होती. इरिनानं सभोंवार नजर फिरवली, सगळीकडे दाट काळोख. " आपल्याला भयानक स्वप्न तर पडलं नाहींना ?" अशी तिला शंका आली. तिच्या आंगावरील कोटाच्या कॉलरमधून बर्फाचे तुकडे आंत घसरत होते तोंडाला गार वारा जणूं त्वेषानं कडकडून चावा घेत होता, हात पार कांकडून गेले होते, व हृदय तर इतक्या जोरानं धडधडत होतं, किं त्याचे ठोके तिला स्वच्छ ऐकूं येत होते. तें लेनिनग्राड शहर नसून, शत्रुंच्या भुंकणाऱ्या व आग ओकणाऱ्या तोफांना, थंडीत तुफानवेगानं उसळणारं काळंकुट्ट वादळ, हें जणूं चवताळून, त्वेषानं दिलेलं प्रखर उत्तर आहे, असंच वाटत होतं. कुलूप असलेलं तें लोखंडी दार खडखडविण्यांत, किंवा कुणाला हांका मारण्यांत कांहीं अर्थ नव्हता. कारण रस्ता ओसाड, दिसत असून, सकाळ होईपर्यंत. त्या बाजूला कुणी फिरकण्याचं चिन्हही नव्हतं.

...इतकं होतं, तरी अशा घनांधःकरांत, चोहोंकडून मोकाट सुटलेले वांग धिंगाणा घालीत आहेत, अशा वेळीं, अगदीं उघड्या ठिकाणीं, एका नूतन बालकाचा जन्म होत होता. थंडीपासून, तोफांच्या अविरत भडीमारांतून, त्याला वांचविणं अत्यंत जरूर होतं. इरिनाचे कान तर इतके बधिर झाले, कीं आसपास फुटणाऱ्या तोफांच्या गोळ्यांचा प्रचंड स्फोटमुध्दां, तिला एकूं येईनामा झाला. ती बाळंत होत असलेली बाई, जणूं एकाद्या सुसज्ज हॉस्पिटलच्या उबदार वॉर्डातच आहे, अशा रितीनं, इरिना तिचं बाळंतपण करीत होती.........

............अंधारांत गडप झालेल्या शहराला, दाखवायला म्हणूनच कीं काय, इरिनानं, तें नुकतंच उपजलेलं मूल वर उचललं, तें रडायला लागलं... तसंच उचलून, त्याला इरिनानं कोटाखालीं छातीशीं घट्ट धरून ठेवलं व तशीच त्याला घेऊन ती बर्फांतून चालायला लागली. रस्त्यावरील बर्फावर, कुणाचंही पाऊल उमटलेलं दिसत नव्हतं.

......तिच्या मागोमाग, इरिनाबरोबर आलेल्याच्या,खांद्यावर आंग टाकून, मुलाची आई जेमतेम पावलं टाकीत होतीं. चालतां चालतां मध्येंच एकदम पायाखालील बर्फ घसरल्यानं ती खालीं कोंसळे. तिचा घसा कोरडा पडला असून आवाज तर अतिशय क्षीण झाला होत. म्हणाली "सोडा मला ! मी चालेन आपली एकटी."

"आतां अगदीं जवळ आलंय्. लवकरच पोंचूं आपण."

जोराच्या वाऱ्यानं, त्यांच्या तोंडावर एकसारखं बर्फ उडत होतं, प्रत्येक तोफेचा गोळा फुटला, कीं कांचेच्या चुराचा नुसता पाऊस पडे. पण तीं मात्र, त्या घनदाट रात्रीवर, तोफांच्या सरबत्तीवर, विजय मिळवून आलेल्या जेत्यां प्रमाणं अभिमानानं मार्ग आक्रमीत होतीं. तशीच जर वेळ आली असती, तर या भयाण प्रसंगी, त्या नूतन जन्मलेल्या बालकाला घेऊन. ही मिरवणूक सबंध लेनिनग्राडला प्रदक्षिणा घालून हॉस्पिटलांत आली असती !

......आपल्याला मुलगी झाली आहे, हें आईला केव्हांच कळलं होतं. तिला घेण्यासाठीं आईची केवढी मोठी चुळबुळ चालली होती. तिचा जीव मारखा

खालीवर होत होता. आईचंच हृदय तें ! तिच्या मनांतून, आपली मुलगी हरिनाच्या हातांतून घ्यायची होती. सतरांदा तिनं हात पुढं केला व मागं घेतला.

शेवटीं, तीं हॉस्पिटलपाशीं आलीं. त्या बाईला बिछान्यावर झोंपविण्यांत येऊन तिची सर्व व्यवस्था करण्यांत आली. आईनं हरिनाला, आपल्याजवळ बोलावलं. तुटक पण, करारी सुरांत तिनं विचारलं.

" काय ग, तुझं नांव काय ? "

" कां बरं ? " हरिनानं गोंधळून उलट पृच्छा केली.

" मला कळलंच पाहिजे, तुझं नांव. " ती निश्चयी सुरांत म्हणाली.

" माझं नांव हरिना, पण तुम्हांला कशाला हवंय् माझं नांव ?"

" मी माझ्या मुलीला, तुझंच नांव ठेवणार आहे. जन्मभर तिला तुझी आठवण असूं दे. बाईग, तुझ्यामुळं माझ्या मुलीचा जीव वांचला, तुझे आभार तरी कसे मानायचे… …" असं म्हणून, कां कुणास कळे, तिनं, हरिनाचं तीनदां चुंबन घेतलं. हरिनानं तोंड फिरवलं… तिला हुंदका आवरेना. तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या !

# कॉमरेड किकि : : : : ३

किकि हा एक लहानसा, सर्वांगावर काळेभोर केस असलेला सेटर जातीचा कुत्रा होता. त्याचे डोळे किंचित् तांबुस रंगाचे असून, त्यांत आश्चर्यकारक चमक दिसे. चालतांना, त्याचे लांबचलांब कान, डोक्याभोंवती सुपासारखे डोलत. पण याहीपेक्षां विशेष म्हणजे, किकिला हंसतां येत असे. त्याला थोपटलें, चुचकारलें किंवा त्याच्याशीं कांही बोललें, म्हणजे एकदम त्याचे पांढरे शुभ्र दांत दिसत, आणि त्याच्या तोंडाचा पुढील भाग किंचित आंत ओढला जाऊन, त्याच्या तोंडावर मैत्रीचें हास्य चमकायला लागे. किकिला हंसता येत होतं कि नाहीं, याविषयीं शंकाच नव्हती, खरोखरीच किकि हंसत असे.

पिरनी पर्वताच्या कडेशीं असलेल्या, आमच्या या सैतानी कॉन्संट्रेशन कॅंपमध्यें, किकि कसा काय आला, हें कुणालाच ठाऊक नव्हतं. एके दिवशीं, आम्ही, आमच्यावर जबरीनें लादलेलं काम, करीत होतों. त्यावेळीं एकदम किकि कुठून तरी उपटला व आमच्यांत सामील झाला. एकदां पहांटेच्या वेळीं, आमच्या बराकीला बाहेर जाऊन काम करण्याचा हुकूम देण्यांत आला, तेव्हां

पाहतों तों, किकि ( आमच्या बरोबरच ज्यांना कैद भोगायची होती ) अशा एका तुकडीच्या पुढाऱ्याजवळ उभा. आम्ही तिघां-तिघांच्या रांगा करून, कवाईतीच्या थाटांत चालू लागलों, तेव्हां आमच्या पहिल्या तिघांच्या पुढें, किकि आनंदानें भुंकत चालला होता. आम्ही रस्ते-बांधणीच्या कामाला गेलों, शेतावर काम करायला गेलों, कबरस्तानांत काम करायला गेलों, तरी किकि आमच्याबरोबर आहेच; संध्याकाळ झाली, कि आमच्याबरोबर तो परत यायचा. आम्ही किकिला स्पॅनिश इंटर-ब्रिगेडिअर्सच्या बराकींत ठेवला होता. नाहीं तरी तिथं असलेल्या, दोनशें धडधाकट मजबूत शिपायांना. प्रेमाचं असं कुणी तरी हवंच होतं, कारण तिथं कांही कुणी स्त्रिया नव्हत्या. किकि आम्हां सर्वांचा लाडका बनला होता. आम्हांला थोडंसं मांस मिळालं, कि त्यांतले तुकडे आम्ही किकिला घालीत असूं. त्याच्या मऊमऊ केसाळ अंगावरून हात फिरवून, मोठ्या प्रेमानं गोंजारीत असूं. किकिला एका ठिकाणीं रहायला आवडत नसे, म्हणून, आमच्या बराकींतील प्रत्येक गटानें, किकिची राहण्याची " स्पेशल " व्यवस्था केली होती. किकिला आमच्यांतील, बर्थेलजवळ खेळाबागडायला मनापासून आवडे. बर्थेल, हा एकवीस वर्षांचा व्हिएन्नांतील कामगार असून, हा माद्रिदजवळील कॉर्डोव्हा आघाडीवर, चॅपयेव्ह बॅटॅलियनामधून लढला होता. दररोज संध्याकाळीं बर्थेल किकिजवळ बसून, आपल्या व्हिएन्नाच्या बोलींत, तास न तास, गप्पा मारीत बसे; किकि त्याच्याकडे मोठ्या गंभीर नजरेनें टक लावून पहायचा, हंसायचा व आनंदानें भुंकायचा. असं म्हणत कि, किकि, फक्त आमच्या बराकींतल्या लोकांच्या हातचं अन्न घ्यायचा: दुसरं कुणीही त्याच्यापुढं खायला ठेवलं तरी, तो तिकडे ढुंकूनसुद्धां पहायचा नाहीं. तो आमच्या बराकींतल्या प्रत्येकाला ओळखीत असे. आमच्यावर पहारा करणार, गार्ड व सार्जण्ट यांच्या मात्र तो वाऱ्याला देखील उभा रहात नसे. किकिला, खरोखरच माणुसकी होती.

एकदां दुपारीं, बर्थेल व त्याचे मित्र, अगदीं खिन्न व निराश होऊन बराकींत आले. त्याचं कारण असं झालं कीं, रस्ता बांधण्याच्या वेळीं मोठमोठाले दगड ओढून आणायचं काम, बर्थेलला देण्यांत आलं होतं. पण ते त्याला भरभर ओढतां आले नाहींत, म्हणून, गार्डांनीं त्याचा " फूटबॉल " करायचा प्रयत्न

केला. हा फूटबॉलचा खेळ असा कि, एकानें एक मोठा दगड, एका जागेपासून तीस ते पन्नास वेळां, दुसऱ्या ठिकाणीं ओढीत न्यायचा. व पुनः परत पहिल्या जागेवर आणायचा, आणि हें काम अगदीं झटपट व्हायला पाहिजे. ओढण्याचं काम चालू असतां, जर एकादा गार्ड, " गोल ! " म्हणून ओरडला तर कैद्यानें दगड तसाच ठेवला पाहिजे; दुसरा गार्ड " गेट ! " ओरडला. किं कैद्यानें तो जड दगड उचलून पहिल्या गार्डजवळ धांवत गेलें पाहिजे. इकडून तिकडे, धांवतां धांवतां, दम लागून, थकलेला कैदी जमिनीवर कोलमडून पडेपर्यंत. हा खेळ असा चालू असतो. असल्या महामूर्ख व क्रूर खेळांत, दगड उचलायचं काम घेऊन, भाग घेण्याचं, बर्थेलनें चक्क नाकारलें. त्याबरोबर एका आडदांड गार्डानें, त्याच्या डोक्यावर रबरी दंडुक्याचा फटका मारून त्याला खालीं पाडलें. किकि मोठ्या संतापानें भुंकू लागला, व त्यानें बर्थेलवर हल्ला करणाऱ्या गार्डावर झडप घालून, त्याच्या विजारीचा तुकडा टर्रकन् फाडला. व तिथून धूम पळत सुटला.

या प्रकारापासून, किकि त्या गार्डाचा द्वेष करूं लागला; त्यांच्या समोर येणं नको म्हणून तो लांब लांब पळत असे. गार्ड, किकिला धोंडे मारून हांकलीत. व त्याला बराकींत येऊं देईनात.

× × ×

आमच्या कॅम्पभोंवतीं, चारशें सशस्त्र मोबाईल गार्डच नव्हे, तर पायदळ सैन्याच्या दोन तुकड्यासुद्धां आहेत. या पायदळांतले शिपाई, वसाहतींतून आणलेल्या गार्डांसारखे नाहींत, ते फ्रान्सच्या दक्षिण विभागांतील, मजूर व शेतकरी असून मोठे दिलदार आहेत. किकि त्यांच्याबाजूला गेला हें फार चांगलं झालं.

एकदां सकाळीं ६ वाजतां आमच्या विभागांत झेंडावंदनाचा कार्यक्रम होता. कँपच्या दरवाजाजवळ तिरंगी बावटा उभारायचा असल्यानें, पायदळांच्या तुकडीबरोबर कवाईतींत सामिल होण्याचा आम्हांला हुकूम मिळाला. आमच्या तुकडीच्यापुढें आमचा मुख्य, अशा रितीनें, लष्करी शिस्तीत पावलें टाकीत आम्ही कँपच्या दरवाज्या जवळ येऊन, कवाईतीसाठीं रांगेत उभे राहिलों. थोड्याच वेळांत, पुढें बिगुलवाले व कमांडर, व मागें पायदळाची तुकडी, या

थाटांत ते आले. पायदळाची तुकडी आमच्या समोर उभी करण्यांत आली. कॉर्पोरल टक्टक् बूट वाजवीत, कँपच्या संत्री पहारेकऱ्याजवळ जाऊन, उभा राहिला: त्यानें झेंडा सारखा करून वर चढविण्याची तयारी केली. ऑफिसरची पाठ वळली. असें पाहून आमच्या समोर उभे असलेले पायदळांतील शिपाई, आमच्याकडे पाहून, डोळे मिचकावूं लागले; त्यांच्यापैकी, एक मजबूत रांगडा शिपाई होता, तो तर तोंड वेडीवांकडी करून वांकोल्या दाखवूं लागला; दुसऱ्यानें पाय लांबरुंद करून आळस दिला. त्या शिपायाच्या पायांवर वांकड्यातिकड्या उड्या मारून किकि, जणुं सकाळचा व्यायामच करूं लागला. आम्हांला हंसू आवरेना. इतक्यांत ऑफिसरनें हुकूम फर्माविला. " झेंड्याला सलामी द्या ! प्रेझेंट आर्म्स ! ( बंदुकीचा सलाम द्या ! ) " बिगुल वाजूं लागला: पायदळांतील सैनिकांनी बंदुका समोर धरल्या; आमच्या तुकडींतील कैद्यांनीं उजवीकडे नजर फिरविली: झेंडा हळूहळू वर चढूं लागला. पुनः बिगुल वाजूं लागला. बिगुल वाल्याच्या उजव्या बाजूला किकि होता तो एकदम रडायला-भुंकायला-गायला लागला. ऑपेरा नटाप्रमाणें तो उच्च स्वरांत भुंकत होता. कर्कश स्वरानें भुंकत होता. झेंडावंदनाच्या वेळचें गंभीर वातावरण व लष्करी थाट हें ताबडतोब बिघडून गेलं. झेंडा ज्यावेळीं वर चढविला जात होता त्यावेळीं ऑफिसरचा हात पोलादी हेल्मेट ( टोपीवर ) होता, पण क्रूर दृष्टीनें तो भुंकणाऱ्या किकिकडे पहात होता. जरासुद्धां त्यानें किकिवरील नजर वळविली नाहीं. " **आराम ले** !" अशी आज्ञा दिल्याबरोबर, त्यानें " किकि, जर पुनः कधीं, कँपमध्यें भटकतांना आढळला, तर त्याला ताबडतोब गोळी घालून ठार करा " असा हुकूम सोडला. संत्री पहारेकरी किकिच्या मागें धांवले, व त्यांनी त्याला कँपबाहेर पिटाळला.

संध्याकाळ झाल्यावर पाहतों तों किकि पुनः कॅम्पमध्यें हजर. आंत आला तरी त्याला पुरं ठाऊक होतं किं, लष्करी बराकींत आपलं मरण टेवलेलं आहे: म्हणून तो, आमची बराक व कांटेरी तारेचें कुंपण याच्यामधोमध चोरासारखा रेंगाळत होता. आम्ही त्याचं मोठं मानाचं स्वागत केलं. आमच्यापैकीं प्रत्येकानें किकिला लोणी लावलेल्या पावाचा नाहींतर, मांसाचा तुकडा दिला.

बर्थेलला फारच आनंद झाला. त्यानं किकिला वर उचलून घेतलं व

त्याच्याशीं गप्पा मारायला सुरवात केली. बर्थेलनं किकिची शाबास म्हणून पाठ थोपटली व त्याच्यावर थोडासा रागावलासुद्धां. आमच्यांत एक म्हातारा खलाशी आहे—आम्ही त्याला, अमेरिकन, अशी हांक मारतों. त्याची गंमत अशी किं तो" मी लॉस अँजेलिसला असतांना, एका आठवड्यांत हजार डॉलर्स मिळविले, "अशी एकसारखी फुशारकी मारीत असतो. हा अमेरिकन किकिला म्हणाला " कायंग किकि, तुला कांटेरी तारेच्या कुंपणांतून बाहेर पळून जातां येत तरी, तुला आमच्याबरोबर रहायला आवडतं ! वेडा कुठला !" पण लगेच बर्थेल, किकिची बाजू घेत म्हणाला " किकि आमचा आहे ! आपण जसे स्पेनमध्ये स्वयंसेवक म्हणून गेलों होतो, तसा किकि स्वयंसेवक म्हणून इथं आला आहे !" आधींच काळजी घेतलेली बरी, म्हणून आम्हीं किकिला, वरच्या माळ्यावर बर्थेलच्या गवताच्या पोत्याजवळ बांधून ठेवला. केव्हांही गार्डनी शिटी फुंकली, बिगुल वाजल्याचा आवाज आला, करडा हुकुम ऐकूं आला, किं लगेच किकि लहानशा स्वरांत, रडायला—भुंकायला लागतो. आमच्या बराकींतले कॉमरेडस् जेव्हां सकाळीं, रांगेत उभे राहता, किंवा कामाला जातात, तेव्हां जर किकिला तिथं हजर राहतां आलं तर किकिला, किती बरं आनंद होईल !

एकदां दुपारीं, खरोखरच किकिनं कॅम्पमध्यें आपलं तोंड दाखविलं. आमच्या तुकडीला नुकतंच बाहेर कामावर जाण्यासाठीं बोलाविलं होतं.—आणि समोर पाहतों तों—आमचा डोळ्यांवर विश्वास बसेना—आमच्या तुकडीच्या उजव्या बाजूला किकि उभा होता.—त्याच्या गळ्याभोंवतीं एक तुटलेला दोरीचा तुकडा लोंबत होता. चटकन आमच्यापैकीं एकानं त्याला उचललं व मागच्या रांगेत नेलं. दुर्दैवानें, झेंडावंदनाच्या दिवशीं ज्या ऑफिसरनें, किकिचें " गाणं " ऐकलं होतं—तोच—नेमका तोच ऑफिसर कॅम्पच्या दरवाजाजवळ खडा होता. " या कुत्र्याला गोळी घालून ठार करा " असा त्यानं हुकूम सोडला. पण जिथून पळून जातां येईल अशा ठिकाणीं, आम्ही, किकिला ठेवला. भराभर सगळ्या गार्डांनी किकिचा पाठलाग करून त्याची शिकार करायला सुरवात केली. जणूं एकादा भयंकर राजकैदी तारेच्या कुंपणांतून पळून जात आहे व त्याला पकडायचा आहे, या थाटांत गार्डांनीं त्याचा पाठलाग केला; त्याच्यावर धोंड

फेंकूं लागले. पण किकि मुलुखाचा चपळ ! पण शेवटीं, आमच्या बराकीपुढील कांटेरी कुंपणाजवळ, गार्डांनी किकिला अडविला. पण तो पठ्या, कांहींकेल्या त्यांच्या हातीं लागेना. बाराकींतले पंधराशेंजण—जवळजवळ तमाम बराक—त्या तारांच्या कुंपणापाशीं जमा झाली आहे. सर्व बाजूंनी गार्डांवर. शिव्याशापांचा वर्षाव होऊं लागला. कारण किकि हा आमच्यातला एकजण होता. कुणास ठाऊक, कधीं काळीं आमची देखील त्या कुंपणाजवळ अडवून घेण्याची पाळी यायची.

आतां आमचे सार्जण्टसाहेब त्याठिकाणीं येऊन दाखल झाले. "संगिनी रोखा !" हुकूम कडाडला. जणुं कांहीं त्यांना शत्रूच्या ठाण्यावरच हल्ला चढवावयाचा होता. किकि, शांतपणें तारेवर बसून, आमच्याकडे प्रश्नार्थक मुद्रेनें पहात होता. आम्हीं सार्जेंटकडे वळून म्हटलं "सार्जेंट, थांबा, आम्हींच त्याला रस्त्यावर नेऊन सोडतों !" सार्जेटसाहेब आमच्याकडे डोळे वटारून पाहूं लागले. जणू कांहीं त्यांचे लाल डोळे म्हणत होते, "तुम्हीं आणि तो कुत्रा एकाच जातीचे आहां. !" तो आपल्या संगिनीनें किकिला टोंचूं लागला. किकि चटकन उडी मारून त्याला हुलकावणी दाखवूं लागला. पण बाजूला उभ्या असलेल्या गार्डांनी त्याच्यावर संगिनींचा हल्ला चढविला. किकि कळवळून केकाटूं लागला. त्यासरशीं आमच्यांतून हजारों कळवळल्याचे आवाज व संतापाच्या धमक्या उमटल्या. खरोखर काय क्रूर दृश्य तें ! किकि व आमचे आवाज यांचे एक भेसूर—भयानक संगीतच ! गार्डांनीं आमच्यावर बंदुकीचे दस्ते व संगीनी रोखल्या. "धोक्याचा इशारा" देण्यासाठीं म्हणून सार्जेटनें शिटी बाहेर काढली. आमच्या कँटीनची आत्याबाई, (कर्जाऊ पैसे देऊन, भलतंच व्याज आकारण्यांत हिचा हातखंडा होता बरं, ) आपल्या दोन मुली मिमी आणि पेपा यांच्यासकट तिथं हजर झाली. मिमी वीस, तर पेपा, पंधरा वर्षांची होती. जणूं कांहीं कुंपणासमोर तमाशाच चालू होता, म्हणून त्या सगळ्याजणी तो बघायला लोटल्या होत्या. आमच्यावर संगिनी रोखलेल्या पाहतांच, आत्याबाईनीं कॅन्टीनकडे धूम ठोकली; मिमी देखील किंचाळली व कॅन्टीनमधून, गंमत बघायला बरी, म्हणून पळाली. पण पेपा मात्र सार्जेटपाशीं गेली व तिनें खसकन् त्याच्या तोंडातील शिटी ओढली. हा

सर्व प्रकार इतक्या झरंकन् घडला, कि विचारूं नका! हातांत रोखलेल्या संगिनी धरून गार्डांनी आमचा बराकीपर्यन्त पाठलाग केला.

पण किकि कुठं आहे? या गडबडींत तो पार निसटला. संतापानें लाल-बुंद झालेला आमच्या बराकींत आला, व त्यानं " बाहेर व्हा " असा आम्हांला हुकुम दिला. गार्डांनी आमच्या बराकींचा कोपरान् कोपरा धुंडाळला, पण त्यांना किकि सांपडला नाहीं. आमच्या बराकींत एक हेर आहे. आम्ही त्याला " मॅक्स उंदिरमामा–चुव्वा " म्हणतों. त्याच्या नीच कृत्यांबद्दल बक्षिस, म्हणून आम्हीं मागें एकदां, त्याच्या जाकिटांत मेलेला उंदिर बांधून ठेवला होता. याच बेट्यानं बर्थेलचं नांव फोडण्याची चहाडी केली असली पाहिजे. सार्जंटनं, बर्थेलला अटक केली.

मध्यरात्रींच्या सुमारास आमचा एक आचारी बर्थेलला भेटायला आला. बर्थेलला अटक झाली हें कळल्यावर, त्यानं बर्थेलचा मित्र–डॉक्टर, त्याची चौकशी केली. स्वैंपाकखान्याच्या मागील बाजूला एक लांकडाची लहानशी शेड होती. तिथं तो मला घेऊन गेला. त्या ठिकाणीं, कोळशाच्या राशीखालीं, पोत्यावर किकि पडला होता. त्याची मागील उजवी तंगडी व बरगड्या या सर्व फडक्यांनी बांधलेल्या होत्या. किकिचा श्वासोच्छ्वास हळूहळू चालला होता. मघांशी उडालेल्या गडबडींत किकि कांटेरी कुंपणाखालून सरपटत निसटला होता. नंतर आमच्यापैकीं कांहीजणांना तो दिसला, तेव्हां त्यांनीं उचलून त्याला स्वैंपाकखान्याच्या मागें नेऊन ठेवला. मला–बराकींतल्या मित्राला–पाहिल्या-बरोबर किकिनं ओळखलं व शेपटी हालवायला लागला. त्यानं ओठाजवळचा भाग मागें ओढून हांसण्याचा प्रयत्न केला. पण तो फसला. मागच्या पायापेक्षां छातीजवळ झालेली जखम गंभीर स्वरूपाची होती. संगीनीचं टोंक त्याच्या फुप्फुसांतून गेलं होतं. पांचव्या व सहाव्या बरगडीच्या दरम्यान, रक्त सांचून दाटलं होतं. किकि सावकाश श्वासोच्छ्वास करीत होता. मी डॉक्टरप्रमाणें उपचार सुचविला " किकिला पातळ असं कंडेन्स्ड दूध द्या. आणि त्याला शांत पडूं द्या. "

त्या रात्रीं आणखी एक गोष्ट घडली. उंदिरमामा मॅक्स याचा बिछाना एकदम धाडकून खालीं कोसळला. सर्वत्र काळोख होता. काळोखांत तो कांहीं जणांच्या आंगावर पडला. अर्थात् त्यांनीं मॅक्सला हात दाखविला. "खून! खून!" म्हणून मॅक्स किंचाळूं लागला. सकाळीं, पाय मोडला आहे अशा स्थितींत स्वारीला हॉस्पिटलांत आणण्यांत आलें. तो संतापून बोलूं लागला. "नरकांतून, एकवेळ, अनवाणी फिरेन, पण शपथ तर या बराकींतल्या ग्राउंडवर पुन: पाऊल टाकीन !" या हेराची तर, अशी आम्हीं वासलात लावली खरी. पण त्याचा परिणाम काय होणार होता?

× × ×

किकि कुठं आहे. हें दुसऱ्या दिवशीं सकाळीं सगळ्या बराकीला कळलं. पण बराकीबाहेरच्या माणसाला मात्र याचा थांगपत्ता लागला नाहीं. किकि अचानक रितीनें सुधारूं लागला. तो फक्त दुधावर होता. पांच दिवसांनी बर्थेल अंधारकोठडींतील शिक्षा भोगून परत आला. त्याच्या डोक्याला बॅंडेज गुंडाळलें असून उजवा डोळा काळा निळा पडला होता, व समोरचे दोन दांत नाहींसे झालेले दिसत होते. बर्थेलचं आम्हीं मोठं सन्मानीय स्वागत केलं. आचाऱ्यानं गुपचुप रितीनं, या प्रसंगासाठीं केक बनविले.

बरीच संध्याकाळ झाल्यावर, किकि कुठं आहे. तें आम्ही त्याला दाखविलं. किकि अत्यानंदानें नाचूं, वागडूं, ओरडूं लागला. किकि बर्थेलचे हात व तोंड, चाटूं लागला व आपले पुढचे दांत दाखवून, मागच्यासारखा हसूं लागला पण हा अत्यानंद किकिला बराच महाग पडला. थोड्या वेळानें किकि रक्त ओकूं लागला.

दुसऱ्या दिवशीं बर्थेल जेव्हां कंडेन्स्ड दूध घ्यायला कॅंटीनमध्यें गेला तो आपल्या मोठ्या बहिणीच्या--मिमीच्या--मागें उभी असलेली पेपा त्याला दिसली. पेपानं काळजीपूर्वक नजरेनं बर्थेलच्या जखमी झालेल्या तोंडाकडे पाहिलं. बर्थेलला कां अटक झाली हें तिला माहीत होतं--पेपानं एकदम सार्जंटवर झडप घालून त्याच्या तोंडातली शिटी कशी खेंचली--हें बर्थेलला आठवलं. त्यावेळीं ती स्पॅनिश भाषेंत कांहीतरी ओरडली हें पण त्याला आठवलं. पिरनी पर्वतांच्या

या बाजूला स्पॅनिश व कॅटालोनियन लोक राहातात, हें त्याला माहीत नसल्यानं, पेपाला स्पॅनिश भाषा कशी बोलतां येते, याचंच त्याला राहून राहून आश्चर्य वाटत होत. दोघांची नजरानजर झाली. आपल्या जुन्या मित्राला ओळखलं, अशा रितीनं, पेपानं डोळे मिचकावले..........कंडेन्स्ड दूध घेऊन, कॅम्पच्या धुळीनं भरलेल्या काळसर आवारांतून, बर्थेल शांत पावलं टाकीत, विचार करीत करीत बराकींत परत आला. ईतक्यांत एकदम कुणीतरी त्यांच्या खांद्याला स्पर्श केला. " तूं दूध विसरलाय ! " पेपा म्हणाली. बर्थेल गोंधळला असं पाहून, ती हळूच म्हणाली, " मी हे तुम्च्यासाठीं आणलंय् ! सलाम !" इतकं बोलून ती कॅन्टीनकडे धांवली.

बर्थेल आला त्या दिवशीं आनंदाच्या भरांत, किकि जो नाचला बागडला, तेव्हांपासून त्याची प्रकृति फार खालावत चालली. त्याला रोज ताजं दूध लागे. त्याच्यासाठीं गुरांचा डॉक्टर आणणं जरूर होतं. रक्तस्राव चिघळत होता ! शेवटीं, बर्थेलनं, पेपाला या कटांत सामिल करून घ्यावं, असं सुचवण्यांत आलं. पेपाच, आमच्या स्वैंपाकखान्यांत रोज जिन्नस आणून देत असल्यामुळें, चोरून दूध आणण्याचं तिनं कबूल केलं. पेपा, किकिच्या पुढं दुधाचा पेला धरी व बर्थेल हलकेंच त्याचं डोकं वर उचली. किकि एकदोन घोट घेतल्यावर दमून जाई. त्यानं दुधाकडे पाहण्याचं टाकलं. बर्थेल-पेपा दोघंजणं किकिच्या उशाशीं तासूनतास बसून राहात. प्रथम ते किकिशीं बोलत, नंतर आपसांत किकिसंबंधी बोलत- नंतर कँप, सार्जंट यावर त्यांच्या गप्पा सुरू होत. पेपा म्हणे " आमच्या आईचं म्हणणं असं, किं मिमीनं संध्याकाळीं, ऑफिसरांशीं गप्पा झोडाव्या, त्यांच्याबरोबर फिरावं. रोज ती याबद्दल मिमीच्या मागं टुमणं लावते. कारण मग तिला एकटीला कँटीन चालवितां येईल. " पेपा त्याला सांगूं लागली, " सार्जंटांनी, मागं एकदां, गार्डरूममध्यें माझ्यावर हल्ला करण्याचा प्रयत्न केला, पण मी त्या सार्जंटच्या अशी झणझणीत चपराक चढवली ! दुसरा सार्जंट आल्यावर त्याच्या आंगठ्याला इतका कडकडून चावा घेतला, कीं तो विव्हळूं लागला. बर्थेल, तूं मलां स्पेनची माहिती जरूर सांगितली पाहिजे. माझे कांही नातेवाईक पिरनीच्या पलीकडे आहेत, त्यांचं काय झालं ?" बर्थेलला, तिचं कुटुंब स्पॅनिश आहे हें ऐकून फार आनंद झाला. कारण तो

स्पॅनिश लोकांसाठीं त्यांच्या खांद्याला खांदा लावून लढला होता. त्याला स्पॅनिश बोलतां येत होतं. खरोखरच, तो स्पेनसाठीं कां बरं लढला ? बर्थेल तिला आपली हकिकत सांगूं लागला, " माझे वडील गेल्या महायुद्धांत मारले गेले, व मी त्यांचा एकुलता एक मुलगा. आईची नजर चुकवून, मी घराबाहेर पडलों, त्याला तीन वर्षे झालीं. मी बाहेर पडलों हें पाहातांच, माझी आई दारांत धांवत आली; माझ्यापुढं, त्या माऊलीनं गुडघे टेंकले. मला मोठ्या मायेनं पोटाशीं ओढून धरलं, माझी विनवणी करून, मन वळविण्याचा प्रयत्न केला, माझी पाठ थोपटली, माझं प्रेमानं चुंबन घेतलं, पण मी त्याला दाद न देतां घरांतून निसटलों. आमच्या देशांतून, स्पेनमध्यें यायला मला कितीतरी सरहद्दी ओलांडाव्या लागल्या; पण, स्पॅनिश लोकांच्या स्वातंत्र्यासाठीं, त्यांच्याबरोबर लढायचं, असा मी वज्रकठोर निश्चय केला होता. पराभवानंतर, १९३९ च्या जानेवारी महिन्यांत मला सेंट सिप्रीनच्या कॉन्सेंट्रेशन कॅम्पमध्ये ठेवण्यांत आलं, नंतर दुसऱ्या कॅम्पात व सरतेशेवटीं इथल्या कॅम्पात माझी रवानगी करण्यांत आली."

" तुझ्या आईचं पत्र येतंना, त्यांत ती काय म्हणते ? "

बर्थेल स्तब्ध होता.

" तूं तिला पत्र नाहीं लिहीत ?"

" हो, मी लिहिलं होतं ना !"

" मग ? त्याचं उत्तर नाहीं आलं ?"

" कदाचित्, तिला माझी पत्रंच मिळालीं नसतील."

पेपानं त्याचा हात घट्ट धरला. बर्थेलनं तिच्याकडे पाहिलं. तिच्या टपोऱ्या काळ्याभोर डोळ्यांतून अश्रुधारा वहात होत्या. " **पेकिनिओ !** " आपण, बर्थेलपेक्षां लहान आहोंत हें माहीत असूनदेखील ती म्हणाली. बर्थेल गोंधळला, त्यानं हातरुमाल घेऊन तिचे डोळे पुसले. ईतक्यांत किकिनं त्याला आपलं नाक लावलं. बर्थेलची ही वागणूक, न जाणों, किकिला धाडसी वाटली असेल, किंवा बर्थेलचा हेवा देखील वाटला असेल !

त्या दिवसापासून दोघंजणं, रोज किकिजवळ एकमेकांना भेटत. गुरांचा डॉक्टर मिळणं अशक्य होतं; सगळे डॉक्टर आघाडीवर गेले होते. एकदां पेपा बर्थेलला म्हणाली " इथून सुटून जावं असं नाहीं वाटत तुला ? मी तुला मदत करीन. माझ्या ओळखीचा इथं एक पहारेकरी आहे, त्याच्याशीं जर मी नीट वागलें, तर रात्रीं तो तुला बाहेर सोडील." बर्थेलनं उत्तर दिलं " मला एकट्याला इथून सुटायचं नाहीं, व मी या बाबतींत निर्णय देऊं शकत नाहीं. तूं त्या पहारेकऱ्याशीं नीट वागण्याऐवजीं—मीं त्याचं थोबाड रंगविलेलं पत्करलं !..."

" पेकिनिओ ! तूं त्याचं थोबाड रंगवशील ? " असं म्हणून, पेपा मोठ्यानं हंसू लागली. तिनं बर्थेलचं चुंबन घेतलं. कारण, हें त्याचं उत्तर ऐकून तिला मनापासून आनंद झाला होता. बर्थेल शांत होता. किकि विव्हळत होता—पण आतां मात्र तो आनंदांत विव्हळत होता. पण या नाजुकशा ओरडण्यानंदेखील त्याला दुःख होत होतं ! झेंडावंदनाच्या दिवशीं किकि कसा मोठ्यानें गात होता !

" तुला संधी मिळत असेल, तर तूं इथून निसटून कां जाऊं नये, हें मला समजत नाहीं—" पेपानं पुनः एकदां खोदून विचारलं.

बर्थेलनें, बंधुभाव म्हणजे काय हें तिला समजावून सांगितलं. बंधुभावाची शिस्त, एकजूट, स्वयंस्फूर्त आज्ञाधारकपणा, हा पोलादाप्रमाणं कसा कणखर असतो हें सुध्दां तिला सांगितलं.

आतां, आपण असं समजूं या कीं, वर सांगितलेली गोष्ट एकाच कँपात नव्हे, तर कित्येक फ्रेंच कँपांत घडली: मी स्वतः पांच निरनिराळ्या कँपांत होतों. पेपा, बर्थेल ही खरीं नसतील, कल्पनात्मक असतील. तरी असल्या गोष्टी अनेकदां घडल्या आहेत. मी काय म्हणतों, तें तुमच्या ध्यानांत आलंना ? बरं, तर मग, आतां आपण किकिची गोष्ट थोडक्यांत संपवूं या.

किकिची छाती सुजून, त्यांत पू होत होता, तेव्हां कुणाला तरी गुरांचा डॉक्टर आणण्यासाठीं, शहरांत जावं लागलं. या संधीचा फायदा घेऊन, आम्ही आमचीं पत्रं तिच्या हातीं पाठवलीं. बर्थेलचं म्हणणं असं पडलं कीं, लष्करी

कायदा सर्वत्र जारी करण्यांत आला आहे, आणि ही पत्रं नेण्यांत ती, थोडा फार धोका स्वीकारीत आहे, हें आपण पेपाला नीट समजावून दिलं पाहिजे. पेपानं तात्काळ उत्तर दिलं, "हेंच काय, पण जरूर पडेल तेव्हां, याहीपेक्षां जबाबदारी घेण्यास मी तयार आहे." दोन दिवसांत, पेपाच्या हातीं, आमच्या पत्रांची उत्तरें आम्हांला मिळालीं. खरोखर, पेपा ही, शूर, चलाख आणि विश्वासू, लहान पोर आहे. पेपा आमची मैत्रीण आहे. किकि मृत्युपंथाला लागला असतांना, आमच्या स्नेहभावाचे बंध अधिक दृढ होत होते.

आम्ही आठजण, त्या रात्रीं लहानशा लांकडी शेडमध्यें उभे होतों. बर्थेलनं, किकिला हातांत धरलं होतं. त्यानं त्याच्या तोंडाला थंडगार चहा लावल्यावर, किकि कसाबसा चाटायला लागला; तो आम्हां प्रत्येकाकडे नजर फिरवीत होता, पण त्याला दारुण यातना होत असल्या पाहिजेत हें आम्हीं ताडलं. त्याला चुकल्या चुकल्यासारखं होत होतं. ॲलेक, बर्थेलला म्हणाला,

"बर्थेल, त्याला माझ्याजवळ दे, त्याच्या मनांतून तुला डोळे असून पाह्यचंय्!" बर्थेलनं, मृत्युपंथाला लागलेल्या किकिला हलकेच ॲलेकच्या हातांत दिला, व किकिकडे वळून, आपल्या व्हिएन्नाच्या भाषेंत म्हणाला "आमचा किकि कुठं असेल बरं? आमचा कुत्रा कुठं आहे? माझा जिगर दोस्त कुठं आहे?" "किकिनं आपल्या दोस्ताला ओळखलं; त्याला आतां शेपटी हलवितां येत नव्हती, पण त्यानं आपलं तोंड उघडलं, त्याबरोबर आंतले पांढरे शुभ्र दांत चमकले. बिचारा किकि आपल्या हयातींत शेवटचा हंसला. नंतर त्यानें आपले गंभीर, चमकदार, पिंगट डोळे मिटले.

"किकि, मी तुला वचन देतों, किं आम्हीं तुझ्या मरणाचा सूड घेणार आहोंत!" ॲलेक म्हणाला.

सबंध रात्रभर, बराकींतले सैनिक, किकिचं शेवटचं दर्शन घ्यायला येत होते, पांच पांच, दहा दहाजणांचे गट काळोख्या रात्रीं कँपच्या आवारांतून येत होते. पुष्कळांचं मत ॲलेक सारखंच होतं. सकाळपर्यन्त बराकींत, ज्याच्या त्याच्या तोंडी एकच विषय आला होता, तो म्हणजे किकि—आमचा हरपलेला कॉमरेड! त्या रात्रीं बराकींत कुणाला झोंप लागली नाहीं.

किकि गेल्याची बातमी पेपाला दुसऱ्या दिवशीं दुपारीं समजली. रात्रीं ती कांटेरी कुंपणाजवळ होती. आम्ही तिच्या हातांत एक गठडी दिली.

पेपानं किकिला—कँपच्या आवाराबाहेर—स्वतंत्र, मोकळ्या भूमींत मूठ-माती दिली. "एक दिवस मीं त्याचं थडगं तुम्हांला दाखवीन" असं तिनं आम्हांला वचन दिलं.



# किल्ल्यांचा जुडगा : : : ४

माझ्याजवळ मासे भरलेला टिनचा डबा असून, त्याचं झांकण मी आपल्या नेहमींच्या चाकूनं उघडण्याचा प्रयत्न करीत होतों, इतक्यांत माझा दोस्त म्हणाला " अरं, जरा थांब ! माझ्याजवळ कॅन–ओपनर ( झांकण उघडायचा चाकू ) आहे."

वास्तविक त्याची आणि माझी, तशी कांही मोठी मैत्री नव्हती, पण या लढाईमुळं मात्र, आमची दोस्ती जमली. आम्ही दोघेजण रस्त्याच्या कडेला असलेल्या बंधाऱ्यावर, मजेंत बसलों होतों. दोरोगुवुझच्या आसपास सकाळीं जे आम्हीं भेटलों, तेव्हांपासून आघाडीच्या बाजूचे रस्ते तुडवीत, आतांपर्यंत भटकत होतों. आम्हां दोघांनाही, एकाच तुकडीला जाऊन मिळायचं होतं.

माझ्या जोडीदारानें खिशांत हात घालून, आंतल्या सर्व वस्तू बाहेर काढून, गवतावर ठेवल्या. कितीतरी वस्तू होत्या त्याच्या खिशांत ? कोटाचीं बटणं, हात–बॉंबचा डिटोनेटर, सिगरेट–होल्डर, किल्ल्यांचा जुडगा, पिस्तुलाचीं काडतुसं, पेन्सिलीचं थोटूक आणि तो हवा असलेला कॅन–ओपनर !

मी तो कॅन–ओपनर उचलला व माझा मित्र, आपला खजिना पुनः खिशांत कोंबूं लागला. फारच मोठा होता त्याचा खिसा ! सरतेशेवटीं, त्यानं किल्ल्यांचा जुडगा हातांत धरला. व तो जरा वेळ थांबला.

" घराच्या किल्ल्या ! एकतीस, गॉर्की स्ट्रीट, अपार्टमेंट नंबर नऊ, मिन्स्क." तो म्हणाला.

तो किल्ल्यांवरून हात फिरवीत असतां, विचारांत गढून गेलेला दिसला.

" ही मोठी चावी आहे ना, ही खालच्या मजल्याच्या पुढील दरवाज्याची. ही अपार्टमेंटच्या दाराच्या कुलुपाची. ही ल्यूसीच्या खोलीची–आणि ही माझ्या टेबलाची.........तुम्हांला कदाचित खरं वाटणार नाहीं, पण या किल्ल्या जर कां हरवल्या, तर मला चैन पडणार नाहीं. आतां कदाचित, माझं घर जळून खाक सुध्दां झालं असेल.

......कदाचित नसेल सुद्धां—तें कांहीं असो, मी खात्रीनं मिन्स्कला जाणार ! " असं म्हणत काळजीपूर्वक रितीनं त्यानं तो किल्ल्यांचा जुडगा खिशांत ठेवला.



## द्वेष : : : : ५

"तुम्ही जर मनापासून शत्रूचा द्वेष करायला शिकाल, तरच त्याचा पराभव करतां येणं शक्य आहे."

( पीपल्स कमिसार ऑफ डिफेन्स, कॉ. स्तालिनच्या मे-दिनाच्या आर्डर मधून घेतलेलं वाक्य. )

युद्धकालांत, माणसांप्रमाणंच झाडांनामुद्धां जे ललाटीं लिहिलेलं असेल, ते चुकवतां येत नाहीं. आमच्या तोफखान्याच्या गोलंदाजीमुळं, रानाचा एक मोठा पट्टा सफाई कापला गेला. नेमक्या याच जागीं, अगदीं अलिकडे, क्ष खेड्यांतून पिटाळून लावलेले जर्मन, पाय रोंवून बसले होते व इथंच किती तरी दिवस दबा धरून बसण्याचा त्यांचा इरादा होता, पण मृत्युनं झाडांबरोबरच त्यांची मुद्धां सरसहा कत्तल केली. पाईन झाडांच्या बुंध्याखालीं, जर्मन शिपायांची प्रेतं पडलीं होतीं; फर्न व ब्रॅकनच्या हिरवळींत त्यांची चेंगरून, चेंदामेंदा झालेलीं प्रेतं कुजत पडलीं होतीं. तोफेच्या गोळयांनीं जायबंदी झालेल्या पाईन झाडांचा लाखेसारखा सुवास, जरी सगळीकडे दरवळत होता, तरी तो देखील, कुजलेल्या

प्रेतांची दुर्गंधी मारूं शकला नाहीं. तोफेच्या गोळयामुळं काळीं पडलेली व सर्वत्र गोळ्यांमुळं, भुसभुशीत कडांचे खळगे पडले आहेत, अशी भूमातादेखील जे निश्वास सोडीत होती—त्यांना पण थडग्याचा उग्र दर्प येत होता......

आमच्या तोफखान्यानं उध्वस्त केलेल्या रानाच्या त्या भागांत, धीर-गंभीर व शांत अशा यमराजानंच आपलं राज्य स्थापलं होतं, म्हणाना. तोफांच्या भडिमारानं ती जागा खरोखरच नांगरून निघाली होती. कसा कुणास ठाऊक, पण त्या जागेच्या अगदीं मधोमध, एक पांढरा शुभ्र बर्च वृक्ष, शिल्लक राहिला होता. वाऱ्याच्या झुळकीसरशीं, तोफगोळ्यांनीं ओरबाडलेल्या झाडांच्या फांद्या, चमचमणाऱ्या चिकट पानांशीं, गुजगोष्टी करीत. हें आश्चर्यच नव्हे तर काय ?

आम्ही या भागांतून चाललों होतों. माझ्यापुढं चालणाऱ्या तरुण सिग्नलरनं, सहज त्या झाडाला हात लावला व मोठ्या प्रेमळपणानं, आश्चर्यानं, व कळकळीनं त्या झाडाला विचारलं, " कायरे बाबा, तूं या भयंकर भडिमारांतून आपला जीव कसा वांचवलास ?

पाईन वृक्षाला, जर तोफेचा गोळा लागला, तर एकाद्या धारदार कोयत्यानं त्याचा बुंधा कापावा तसा तो उन्मळून पडतो. त्याच्या सफाईदार कापलेल्या वाटोळ्या बुंध्यांतून, डांबरासारखा चीक गळूं लागतो, पण ओक वृक्षाची गोष्ट निराळी आहे.

अशाच कुठच्या तरी एका ओढ्याकांठीं असलेल्या एका जुनाट ओक-वृक्षावर, एक जर्मन तोफगोळा येऊन आदळला. त्या वेड्यावांकड्या दिसणाऱ्या, प्रचंड जखमेमुळं, त्या झाडाचं अर्धअधिक जीवन खच्ची झालं; भयंकर स्फोटा-मुळं झाडाचा उरलेला अर्धा भाग, पाण्याच्या बाजूला वांकला; पाणी मिळाल्यानं, वसंतऋतूंत त्या झाडाला नवजीवन प्राप्त झालं; तें झाड कोंवळ्या पालवीनं नुसतं फुलून गेलं. तुम्ही आज जरी जाऊन पाह्यलंत, तरी तें आश्चर्यकारक ओकचं झाड तुम्हांला दिसेल. जायबंदी झालेल्या त्या झाडाच्या खालच्या फांद्या खळखळ वाहणाऱ्या पाण्यांत बुडल्या आहेत, तर त्याच्या शेंड्याकडील फांद्या, आतां तरी पानं फुटतील, म्हणून आशेनं सूर्याकडे डोळे लावून बसल्या आहेत.

× × ×

खंदकाच्या दाराशींच गेरासिमोव बसला असून, आपल्या तुकडीनं, शत्रूच्या टँक–हल्ल्याचा कसा प्रतिकार केला, याची तो बिनचूक माहिती सांगत होता. गेरासिमोव हा उंच गडी असून, त्याला किंचित पोंक आलं होतं; त्याचे खांदे तर अगदीं भरदार व मजबूत दिसत.

त्याची ओढलेली मुद्रा शांत होती. तो आपले लाल–सुजलेले डोळे किल-किले करून पाहतांना, एकाद्या निर्धास्त, निश्काळजी माणसासारखा दिसत होता. त्याच्या त्या नजरेवरून, याला भयंकर दगदग झाली असावी, हें कुणीही ताडलं असतं. त्याचा आवाज पिचलेल्या बांबूप्रमाणं असून तो बोलतांना मधूनमधून हाताचीं बोटं एकांतएक अडकवी. त्याची ही अशी मूर्ति पाहिली कीं आश्चर्याचा धक्का बसे. कारण, त्याचं तें आडदांड शरीर, व तडफदार चेहरा! त्याला असं कुढत समाधि लावून बसणं हें शोभायचं नाहीं. हातांत हात अडकवून कांहींएक न बोलतां, तो किती तरी वेळ तसाच बसे. बोलून दाखवितां येत नाहीं, असं परमावधीचं दुःख त्याला झालं असलं पाहिजे.

बोलतां बोलतां तो एकदम थांबला व त्याची मुद्रा पालटली. त्याचे गाल फिके पडले. डोळ्याखालील स्नायू त्वेषानं ओढले गेले. दृष्टि समोर रोखली गेल्यानं, एकदम त्याच्या नजरेंत, द्वेषाची अशी कांहीं प्रखर आग भडकली, कीं नाइलाजानं, तो पहात होता तिकडे, मी नजर वळविली. आमच्या अगदीं जवळील संरक्षण हद्दीपुढून, रानांतून, तीन जर्मन कैदी चालले होते. त्यांच्या मागोमाग, लाल फौजेंतील एक शिपाई चालला होता. त्याच्या आंगावरील कपड्याचा रंग उन्हानं विटला असून त्यानं आपली ट्रेंचकॅप बरीच मागं ढकलली होती.

लाल फौजेंतील शिपाई सावकाश पावलं टाकीत चालला होता. त्याच्या हातांतील रायफल, पायांच्या हालचालींबरोबर, मागंपुढं हलत होती; सुरीसारखी दिसणारी संगीन, उन्हांत चकाकत होती. ते जर्मन कैदीदेखील, पिवळट चिखल तुडवीत रखडत चालले होते.

सर्वांत पुढं चालणारा जर्मन कैदी, उतार वयाचा असून, त्याची गालफडं बसलीं होतीं व त्यावर कित्येक दिवसांची वाढलेली दाढी दिसत होती. जातां जातां, त्यानं एकाद्या लांडग्याप्रमाणं, खंदकाकडे दृष्टि फेंकली, नंतर एकदम

फिरविली, व पट्टयावरील टोपी सारखी केली. लेफ्टनंट गेरासिमोव ताडकन् उठला व लाल–फौजेंतील त्या शिपायावर खेंकसला, "कायर ए, हें काय मांडलंयस तूं ? त्यांना काय हवा खायला नेत आहेस, कीं काय ? चलो ! चल, ऊठ, झपझप पाय उचल !"

त्याच्या मनांतून आणखी कांहीं तरी म्हणायचं होतं, पण संतापाच्या भरांत त्याच्या तोंडांतून शब्दच उमटेना. तो एकदम उठला व वळून, धांवत धांवत, पायऱ्या उतरून, खंदकांत गेला. मी आश्चर्यकारक व प्रश्नार्थक चेहरा करून बसलों आहे, असं पाहून, राजकीय शिक्षकानं म्हटलं.

"नाइलाज आहे ! त्याला धक्का बसलाय् !—त्याला जर्मनांनी कैद केला होता, हें तुम्हांला माहीत नाहीं वाटतं ? कधीं तरी ही गोष्ट काढा त्याच्याजवळ: कमालीच्या हालअपेष्टांना, या पठ्यानं तोंड दिलं, आणि, साहजिकच आहे; तेव्हां-पासून, जर्मन दिसला रे दिसला, कीं त्याच्या तळव्याची आग मस्तकाला जाते... विशेषतः, जिवंत जर्मन दिसला तर विचारूंच नका ! मेलेल्या जर्मन शिपायांचे मुडदे पाहतांना त्याला कांहींच वाटत नाहीं, इतकंच नव्हे तर मला वाटतं, ते पाहून, त्याला एक प्रकारचं समाधान प्राप्त होई; पण तें जाऊं द्या—जर कां एखादा जर्मन कैदी त्याच्या दृष्टीस पडला, तर ताबडतोब तो डोळे घट्ट मिटून घेतो, आणि असेल तसा पुतळयाप्रमाणं निश्चल बसतो. संतापानं, त्याचं सर्वांग जळत असतं, तो प्रेतासारखा निस्तेज पडतो किंवा चटकन् उठून चालता होतो." हें सांगतांना, तो राजकीय शिक्षक, अगदीं हलक्या सुरांत बोलत होता.

राजकीय शिक्षक माझ्या अगदीं जवळ सरकला, व जणूं माझ्या कानांत सांगूं लागला; "मी, दोनदां त्याच्याबरोबर हल्ला चढविला होता. तो एखाद्या उमद्या घोड्याप्रमाणं ताकदवान आहे–आणि खरोखर तो काय करतो तें तुम्ही एकदां पाहिलंच पाहिजे—माझ्या आठवणींत मी एकदोनदां पाह्यल्याचं स्मरतं: बंदुकीचा दस्ता आणि संगीन अशी काय सफाई चालवितो म्हणतां—आः !—तें कांहीं नाहीं राव, तें सांगतां येणार नाहीं—नुसता थरकांप सुटतो तें पाह्यलं तरी !"

× × ×

त्या दिवशीं रात्रीं, जर्मन तोफांचा भडिमार चालू होता. थोडा वेळ गेला, किं दूरवर तोफांचा आवाज ऐकूं येई; नंतर जरावेळानं, " हिस्‌स्‌स्‌ " असा आवाज करीत, तोफगोळा, नक्षत्रांनी फुललेल्या आकाशांत, उडतांना दिसे; त्याच्या गुरगुरण्याचं किंकाळींत रूपांतर होऊन तो दूरवर विलीन होई. आमच्या पिछाडीला रस्ता असून, दिवसभर, त्यावरून, सरहद्दीवर दारूगोळा पोंचविणाऱ्या मोटारगाड्यांची येजा चालू असे. या रस्त्याच्या दिशेला, मधूनच, पिवळसर ज्वाला, विजेप्रमाणं चमकायची, व जरा वेळानं, मेघगर्जनेसारखा गडगडाट, कानांवर पडायचा.

तोफेच्या या भडिमारांत, मध्यंतरी जो थोडा विसांवा मिळे त्यावेळीं जवळच्या दलदलींतील बेडकांचं डरांव डरांव, व डांसांची गुणगुण ऐकूं यायची.

आम्हीं हेझलच्या झुडुपाखालीं पहुडले होतों. एका हातांतील टहाळीनं डांसांना मधून मधून हांकलीत, लेफ्टनंट, गेरासिमोव, आपली हकिकत सांगत होता. मला जी आठवते ती खालीं दिली आहे.

" युद्धापूर्वी, मी पश्चिम सायबिरियांतील, एका गिरणींत यंत्रकामगार होतों. गेल्या वर्षीच, मला सैन्यांत बोलाविण्यांत आलं. हो ! बरोबर तारीख आठवते, नऊ जुलैला, मी फौजेंत सामिल झालों. मी कुटुंबवत्सल असून माझ्या घरांत बायको व दोन मुलं आहेत. मला वडील आहेत, पण, शरीरानं ते अधू आहेत. मीं जेव्हां सैन्यांत यायला निघालों, तेव्हां माझी बायको थोडीफार रडली, नाहीं असं नाहीं, जातांना तिनं मला निरोप दिला, " आपल्या देशाचं व जनतेचं शरीरांत प्राण असेतोंपर्यंत रक्षण कर. तशीच आणिबाणीची वेळ आली तर बेधडक प्राण अर्पण कर, कारण हें युद्ध आपण जिंकलंच पाहिजे ! " मला आठवतं, त्यावेळीं मला हंसू कोसळलं, व मी तिला म्हटलं. " कायग, तूं आहेस तरी कोण ? माझी बायको, कां कुटुंबांतील प्रचारक ? काय करायचं, नि कसं वागायचं, हें जाणण्याची अक्कल येण्याइतका मी मोठा आहे असं वाटतं मला; आणि विजयासंबंधीं तर बोलूंच नको; या फॅसिस्टांच्या नरड्यादाबून, आपण विजय हस्तगत करूं, त्याची नको तुला काळजी ! "

" माझे वडील म्हणजे कणखर वृत्तीचे आहेत हें तर खरंच. पण जातां-जातां, त्यांनीमुद्धां, उपदेशाचे चार शब्द सुनवायला कमी केलं नाहीं. "व्हिक्टर: वेड्या, ध्यानांत ठेव किं तूं गेरासिमोवच्या कुळांत जन्माला आला आहेस: गेरासिमोव म्हणजे कांही एकादं फडतूस कुळ नाहीं. तुझे वाडवडील कामगार होते, तुझा पणजा स्त्रोगोनोवच्या कारखान्यांत कामगार होता. गेली शंभर वर्षे आपल्या घरांतलीं माणसं, लोखंड कामगार, म्हणून काम करीत आलेलीं आहेत. तेव्हां या लढाईत, तूं आपल्या कामगार वाडवडिलांची आठवण कायम ठेवून लोखंडासारखं कणखर बनून लढलं पाहिजे, व आपलं-गेरासिमोवचं नांव, राखलं पाहिजे. आपलं सरकार, आपण कामगारांनी बनविलेलं आहे: युद्ध सुरू होण्यापूर्वीच, तुला राखीव सैन्याचा मुख्य अधिकारी नेमण्यांत आलं होतं, तेव्हां शत्रूला सणसणीत तडाखा देणं, हें आतां तुझ्या हातीं आहे."

" बाबा, तडाखा हाणल्याखेरीज, आम्ही सोडीत नाहीं शत्रुला ! " मी म्हटलं.

" स्टेशनवर येतांयेतां मी, जिल्हा पार्टी कमिटीच्या मुख्य कचेरींत शिरलों. आमचे सेक्रेटरी म्हणजे, रुक्ष व चर्चा करण्यांत पटाईत असे होते. माझ्या मनांत सहज विचार आला, किं माझी बायको व वडील यांनी जर उपदेश करायला कमी केलं नाहीं—तर हा पठ्या निदान अर्धातासभर तरी एकादं लांबलचक भाषण ऐकवणार हें खास ! पण याच्या उलट प्रकार झाला. " बस, गेरासिमोव," तो म्हणाला " पूर्वीकाळीं अशी एक चाल होती किं, प्रवासाला निघण्यापूर्वी थोडा वेळ बसावं. "

आम्ही थोडावेळ स्तब्ध बसलों होतों, नंतर तो उठून उभा राहिल्यावर त्याच्या डोळ्यांकडे माझी नजर गेली. त्याच्या चश्म्याच्या कांचा भुरकट दिसूं लागल्या. " वा: ! म्हणजे आज चमत्कारच घडला म्हणायचा ! " मी स्वतःशीं म्हणालों… …शेवटीं तो म्हणाला, " कॉमरेड गेरासिमोव, सांगण्या-सारखं असं विशेष कांही नाहीं. तूं गळ्याभोंवतीं लाल-रुमाल गुंडाळणारा, पायोनिअर असल्या वेळेपासून मी तुला ओळखत आहे. त्यानंतर लीगचा सभासद व गेलीं दहा वर्षे पार्टीसभासद म्हणून मी तुला ओळखतों. या

जर्मन डुकरांना बिलकुल दयामाया दाखवूं नकोस.! पार्टी–संघटणेचा तुझ्यावर विश्वास आहे. " मला वाटतं, त्यानं आयुष्यांत पहिल्यांदा आमच्या जुन्या रशियन रिवाजाप्रमाणं–माझं चुंबन घेतलं. काय असेल तें असो. तो सेक्रेटरी म्हणजे अगदींच रुक्ष होता, असं मला वाटेनासं झालं.

" त्याच्या प्रेमळ वागणुकीचा माझ्या मनावर इतका जबरदस्त परिणाम झाला, किं कचेरीच्या बाहेर आल्यावर माझी मुद्रा आनंदी दिसूं लागली. मला पराकाष्ठेचा आनंद झाला होता. "

माझ्या बायकोनंसुद्धां, मला आनंदी ठेवण्याचा प्रयत्न केला. आपला नवरा युद्धाच्या आघाडीवर चालला आहे अशा वेळीं, त्याला आनंदी ठेवणं हें कांहीं साधंसुधं काम नाहीं, हें मी कशाला तुम्हांला सांगायला पाहिजे ? माझ्या बायकोची देखील मनःस्थिती ठीक नव्हती, तिला कांही तरी महत्वाचं सांगायचं होतं. पण ऐनवेळीं तिचं तिलाच तें आठवेना. स्टेशनांतून गाडी सुटली, तरी ती माझा हात सोडीना, तशीच ती प्लॅटफॉर्मवर धांवत होती. " वित्या, नीट काळजी घे प्रकृतीची नाहीं तर आघाडीवरच तुला थंडीपडसं व्हायचं ! " " नादिया !" मी एकदम म्हटलं, " वा ! मी म्हणजे कुणी कुकुलं बाळ आहे वाटतं ? अग, आघाडीवर तर समशीतोष्ण हवा आहे, तिथं कशाला येईल थंडी नि पडसं ? " तिला सोडून येतांना मला अत्यंत वाईट वाटलं, इतकंच नाहीं तर तिच्या त्या वेडगळ बडबडींतच, मला आनंद वाटला; त्यानंतर मात्र, हळूहळू जर्मनांविषयींच्या तीव्र पण शांत क्रोधानं, माझ्या मनांत ठाणं दिलं. विश्वासघातकी, बेईमानी शेजाऱ्यांनों. ज्याअर्थीं कांहीएक कारण नसतां तुम्ही आमच्या मायभूमिवर हल्ला चढविला आहेत–तेव्हां आतां सांभाळा. तुम्हांला मरेपर्यंत याद राहील असा तडाखा हाणूं तेव्हांच आम्हीं स्वस्थ बसूं. "

थोडावेळ तो स्तब्ध होता. तो आसपास चालू असलेल्या मशीनगन्सचे आवाज ऐकत असावा. तो आवाज जसा सुरू झाला तसा एकदम थांबला.

" युद्धापूर्वी आमची यंत्रसामुग्री जर्मनीहून येत असे. यंत्राचे भाग जोडीत असतां, मी प्रत्येक भाग, पांचपांच, सहासहा वेळां नीट निरखून पहात असे.

कितिदां तरी उलट मुलट फिरवून तपाशीत असें. ते भाग कुशल कामगारांनी बनविले होते, यांत शंकाच नाहीं. हळूहळू मी जर्मन लेखकांची पुस्तकं वाचूं लागलों, आणि नकळतच माझ्या मनांत जर्मन लोकांविषयीं आदर उत्पन्न झाला. हें मात्र खरं, किं मला कधींकधीं असं वाटे किं इतके "हुशार नि उद्योगी लोक, हे आणि इतके उद्योगी हिटलरची दुष्ट राजवट, चालूं देतात हें लज्जास्पद नव्हे काय ?...पण परत असं वाटे, जाउंद्या; तो त्यांचा स्वतःचा प्रश्न आहे. त्यानंतर पश्चिम युरोपांत युद्धाची आग भडकली......... " अशा रितीनं, मी आघाडीवर चाललों होतों खरा, पण माझे विचार एकसारखे चालत; जर्मन सेना म्हणजे यंत्रसामुग्रीनं सुसज्ज अशी आहे. तसाच विचार करायचा म्हटला, म्हणजे अशा यंत्रसुसज्ज, शत्रूशी उघड दोन हात करून, त्याला जमिनीवर लोळविण्यांत, खरी गंमत आहे. कारण १९४१ सालीं, आमच्या फौजासुद्धां मागासलेल्या नव्हत्या. मला हें कबूल केलं पाहिजे–किं शत्रुला कशाची चाड असेल, अशी माझी कधींच अपेक्षा नव्हती. कारण फॅसिझमला कशाची चाड असणार ? पण सर्व नीतिमत्ता व लाजलज्जा गुंडाळून ठेवलेल्या. इतक्या नीच नराधमांच्या टोळक्यांशी, मला लढावं लागेल अशी कल्पना नव्हती. पण प्रत्यक्ष अनुभव मात्र असा आला किं, कोणत्याही प्रकारची माणुसकी, या मारेकरी गुंडांजवळ शिल्लक राहिलेली नाहीं. पण उगाच घाई कशाला–तें सगळं सावकाश येईलच......" आमची तुकडी जुलैच्या अखेरीस आघाडीवर दाखल झाली. सत्तावीस तारखेला सकाळच्या प्रहरीं, आम्हीं हल्ला चढविला. पहिल्या प्रथम, मला हें नवीनच असल्यानं, थोडीशी भीति वाटली. जर्मनांनी ट्रेंच–मॉर्टर्स वापरून, आम्हांला अतिशय सतावलं, पण संध्याकाळच्या सुमारास मात्र, काय चाललं आहे, याचा आम्हांला थांगपत्ता लागला. आम्हींसुद्धां निकरानं लढून त्यांना एका खेड्यांतून पिटाळलं. या चकमकींत आम्हीं सुमारें पंधराजणांना पकडलं. जणूं काय, आतांच समोर घडतंय्–अशी मला त्या प्रसंगाची अगदीं ताजी आठवण आहे. त्यांना आणले तेव्हां त्यांची तोंडं भेदरलेलीं व फिक्कट अशीं दिसत होतीं. आमच्या शिपायांचा सुद्धां आतां राग मावळला असून, जो तो, मिळेलतें घेऊन त्या कैद्यांना आणून देत होता. कुणी तंबाखू, तर कुणी विडी, चहा असं त्यांना देत होता. ते सुद्धां आमच्या

शिपायांच्या पाठीवर थाप मारून " कॉमरेड " म्हणून हांक मारीत होते, व " काय, कामरेड, तुम्हीं लढतां कशासाठीं ? " असले प्रश्न विचारीत होते.

" आमच्यापैकीं एकाची, लष्करांत वीस वर्षे नोकरी झालेली होती. हृदय हालवून सोडणाऱ्या या प्रसंगाकडे, त्यानं थोडा वेळ पाहिलं व नंतर म्हणाला, " अरे, या तुमच्या नवीन मित्रांच्या गळ्यांत गळे घालणं पुरे करा ! इथं, हे सगळे लुच्चे, " कामरेड " होत आहेत. पण हेच दरोडेखोर, आपल्या जखमी शिपायांना व नागरिकांना कसे वागविताहेत तें पहा, नि मग यांच्याशी दोस्ती करा " हे त्याचे शब्द ऐकून, आमच्या डोक्यावर कुणी तरी थंडगार पाण्याची बादली ओतावी, तसं झालं आम्हाला. इतकं बोलून तो चालता झाला.

" त्यानंतर लौकरच आम्ही हल्ला चढविला तेव्हां त्यांची वागविण्याची पद्धत आमच्या नजरेस पडली......गांवच्या गावं जमीनदोस्त करण्यांत आलीं होतीं; शेंकडों बायका, म्हातारेकोतारे, मुलंबाळं, यांना गोळ्या घालून ठार मारण्यांत आलं होतं, लालफौजेंतील शिपायांची छिन्नविच्छिन्न केलेलीं प्रेतं आम्हांला आढळलीं, बायका, मुली—व कांही कांही तर लहान मुलं यांच्यावर जबरी-संभोग करून, त्यांना हालहाल करून ठार मारण्यांत आलं होतं.

" एका गोष्टीची तर माझी आठवण अजून ताजी आहे. ती अकरा एक वर्षांची मुलगी असेल. जर्मनांनी तिला धरली, तेव्हां बहुतकरून ती शाळेंत जायला निघाली होती. त्यांनी तिला एका बागेंत फरफटत नेली, तिच्याशीं जबरीसंभोग केला व नंतर तिला ठार मारली. बटाट्यांच्या राशींत तिचा चोळा-मोळा होऊन पडला होता. ती तर शाळेंत जाणारी एक चिमुरडी पोर होती ! तिची शाळेची पुस्तकं आसपास अस्ताव्यस्त पडलीं असून, त्यांच्यावर तिच्या रक्ताचा शिडकाव झाला होता...तिच्या तोंडावर, तरवारींनं केलेल्या इतक्या जखमा दिसत होत्या, किं तें पाहिल्यावरच एकाद्याला भीति वाटली असती. तिनं आपलं जुगदान, अजून हातांत घट्ट धरून ठेवलं असून, तें आतां उघडं पडलं होतं. आम्हीं तिच्या शरीरावर कपडा घातला व क्षणमात्र स्तब्ध उभे राहिलों. माझ्या बरोबरचे लोक निघून. गेले पण मी मात्र गुटमळत उभा राहिलों, व वेड्यासारखा स्वतःशींच बोलूं लागलों " वारकोव आणि पोलोविनकिन् यांचे

वरच्या वर्गासाठीं लिहिलेलें भूगोलाचं पुस्तक." तें गवतावर पडलेल्या एका पुस्तकाचं नांव होतं. तें पुस्तक, माझ्या चांगलं परिचयाचं होतं. कां ? माझी मुलगी नव्हती कां पांचवींत ? "

" हा प्रकार रुझ्यीनजवळ घडला. स्कीरीला एका बोळांत अनेकांना फांशी देण्यांत आलं होतं. या ठिकाणीं लाल फौजेंतील पकडलेल्या सैनिकांना हालहाल करून ठार मारण्यांत आलं होतं. तुम्हीं कधींकाळीं खाटकाच्या दुकानांत गेला असाल,–थेट त्याप्रमाणं हें ठिकाण दिसत होतं......

" गल्लींतल्या झाडांवरून सैनिकांचीं धडं लोंबकळत असून, ती रक्तानं माखलीं होतीं. प्रेतांचे हातपाय तोडले असून, अर्धी अधिक कातडीं सोलण्यांत आलीं होती.........गल्लीच्या तोंडाशीं आणखी आठ जणांच्या प्रेतांची रास पडलेली होती. या राशींत कुणाचे हातपाय कोणते, हें सांगण्याची मारामार ! चिरफाड केलेल्या, तोडलेल्या, माणसांच्या मांसाचा तो एक ढिगारा होता. या सर्वांच्या वरतीं, एकांतएक बशा ठेवाव्या, तशा लाल फौजेच्या आठ ट्रेंच–कॅप्स रचून ठेवल्या होत्या........." जें जें कांहीं माझ्या नजरेस पडलं, त्याचं हुबेहुब वर्णन करायला शब्द कमी पडतील ! तो प्रसंग तुम्हीं स्वतःच्या डोळयांनींच पहायला पाहिजे. पण मला वाटतं, आतां बराच उशीर झालाय्–विषय बदलला तर बरं " असं म्हणून लेफ्टनंट गेरासिमोव किती तरी वेळ स्तब्ध होता.

" इथं सिगरेट ओढायला कांहीं हरकत नाहीं ना ?" मी विचारलं. " छेः ! पण तिचा उजेड दिसणार नाहीं, याची काळजी घ्या." तो कर्कश आवाजांत म्हणाला. त्यानं पण सिगरेट पेटवली, व बोलूं लागला, "आतां तुमच्या लक्षांत आलं असेल, किं जर्मनांची हीं कृत्यं पाहून आम्हीं चवताळलों आहोंत, यांत कांहीं विशेष नाहीं. आपण माणसांशी लढत नसून, रक्तपिपासू पशूंशी लढत आहोंत, हें आमच्यापैकीं प्रत्येकाला कळून चुकलं. यंत्रं बनवितांना जी सफाई, व काटेकोरपणा ते दाखवीत, तोच आमच्या लोकांना ठार मारण्यांत, अत्याचार करण्यांत, व हाल करण्यांत दाखवितात, हें स्पष्ट झालं. नंतर, आमची थोडी पिछेहाट झाली, तरी, आम्हीं पिसाळल्याप्रमाणं लढत होतों.

" माझ्या तुकडींतले बहुतेक सैनिक सायबिरीयन होते. तरी उक्राइनचा प्रत्येक इंच, आम्हीं कमालीच्या शौर्यानं लढविला. आमच्यांतले पुष्कळ कामास आले होते, तरी जर्मनांची हानी, आमच्यापेक्षां अधिक होती. आम्हीं जरी माघार घेत होतों तरी, आम्हीं कांहीं, सुखानं आमच्या जागा, त्यांना घेऊं दिल्या नाहींत.

" त्यानं सिगरेटचे एक दोन झुरके मारले, व पुढं बोलूं लागला. आतां त्याच्या आवाजांत फरक पडलेला दिसत होता.

उक्राइन, फारच सुंदर प्रांत आहे, आणि आसपासचं वातावरण देखील रम्य आहे. उक्राइनमधील, प्रत्येक गांव, आम्हांला आवडूं लागलं, व त्याच्या-विषयीं, आपुलकी वाटायला लागली. याचं कारण असं असेल, कि त्या खेड्यांसाठीं आम्हीं, आमचं रक्त सांडलं होतं. तेव्हां अशा रितीनं, त्यांच्यांशीं आमचा रक्ताचा संबंध आल्यानं, हा जिव्हाळा निर्माण झाला असेल. त्यापैकीं, एका खेड्यांत तर आमची अशी स्थिती झाली, कि तिथून आमचं पाऊल निघतां निघेना ! किती वाईट वाटलं आम्हांला, तें खेडं सोडतांना ! हें गांव आम्हीं थोड्या दिवसापुरतं सोडणार होतों, तरी, आमचं हृदय भरून आलं, व तिथून निघतांना आम्हीं तोंड फिरवलीं !

" मी जर्मनांच्या हातीं सांपडेन हें त्यावेळीं माझ्या स्वप्नांतसुद्धां आलं नव्हतं; पण तेंच घडलं. सप्टेंबरमध्यें, मी प्रथम जखमी झालों, तरी मी माझ्या तुकडीबरोबरच होतों. देनिसोव्का पोल्तावारीजनजवळ, लढतांना, एकवीस तारखेस, मी दुसऱ्यांदा जखमी झालों व त्यावेळीं मला जर्मनानीं पकडलं.

आमच्या डाव्या बाजूनं जर्मन रणगाडे आंत घुसले; व त्या भगदाडांतून त्यांचं पायदळ, त्यांच्या मागोमाग आंत आलं. आम्हांला त्यांनी वेढलं होतं, तरी निकारानं लढून आम्हीं त्यांतून मार्ग काढला. त्या दिवशीं आम्हीं दोनदां रणगाड्यांचे हल्ले परतविले. शत्रूच्या सहा रणगाड्यांना आगी लावल्या, व त्यांची बरीच नासधूस—मोडतोड करून निकामी केले. एका सशस्त्र गाडीची तीच वाट लावली व एका मक्याच्या शेतांत, सुमारं एकशेंवीस नाझींचा फडशा उडविला; पण यावेळीं, त्यांनीं ट्रेंच—मॉर्टर—बॅटरीज् आणल्यानं, आम्हीं दुपारपासून चार वाजे

पर्यंत, जो उंचवटा रोखून धरला होता, तो सोडावा लागला. सकाळपासूनच उक-डायला लागलं होतं. आकाशांत, औषधाला देखील ढग दिसत नव्हता व उन तर इतकं प्रखर पडलं होतं, किं जीव घाबराघुबरा होई. तोफगोळे एका मागून एक पडत होते, आणि मला आठवतं आम्हांला तहान तर इतकी लागली होती, किं आमचे ओंठ काळेनिळे दिसायला लागले होते. मी हुकूम सोडीत होतों खरा, पण माझा आवाज इतका बसला होता, किं मला स्वतःलाच तो ओळखणं कठीण झालं होतं. आम्ही एका दरींतून चाललों असतां, माझ्या समोरच एक गोळा येऊन आदळला. मला पुसट आठवतं, किं काळ्या मातीचा व धुळीचा एक प्रचंड लोटच्या लोट उसळतांना, मला दिसला आणि—एवढंच. त्याच्या पुढचं मला कांही एक आठवत नाहीं. त्या गोळ्याचा एक तुकडा माझ्या टोपींत गेला, व दुसरा माझ्या उजव्या खांद्यांत घुसला.

"मीं तिथं किती वेळ बेशुद्ध पडलों होतों तें आतां मला आठवत नाहीं, पण पायांच्या आवाजानं मी शुद्धीवर आलों. माझं डोकं वर उचलल्यानंतर, मला आढळलं, किं मी जिथं पडलों तिथं नाहीं. माझ्या आंगावरचा कपडा नाहींसा झाला असून, माझा खांदा कसा तरी बांधलेला होता. माझी टोपी पण मला कुठं दिसेना. माझं डोकंसुद्धां बँडेजनं गुंडाळलेलं होतं पण तें नीट बांधलं नसल्यानं त्याचं एक टोंक माझ्या छातीवर रुळत होतं. मग माझ्या डोक्यांत प्रकाश पडला, किं मी जखमी झालेला पाहतांच आमच्या लोकांनी मला उचलून नेलं व जातांजातां घाईघाईत बँडेज बांधलं असावं. पुष्कळ वेळानं मी मोठ्या कष्टानं डोकं वर उचललं तेव्हां ते दिसतील अशी माझी अपेक्षा होती. पण माझ्याकडे जे धांवत आले, ते आपले लोक नसून जर्मन होते ! त्यांच्या पावलांच्या आवाजानं मी सावध झालों होतों. सिनेमाच्या पडद्यावरील चित्रां-प्रमाणं ते मला स्वच्छ दिसत होते. मी आसपास चांचपून पाहिलं. रिव्हॉल्व्हर, रायफल तर जाऊंद्याच, पण माझ्या हातांशी त्यावेळीं एकादा हातबाँबसुद्धां नव्हता. कुणी तरी—तो बहुतेक आमच्यांपैकींच असावा—माझी हत्यारं नि डिस्पॅच—केस काढून घेतली होती. "शेवटीं असं झालं ह्मणायचं !" मी स्वतःशींच ह्मटलं. दुसरा कसला बरं, विचार करीत होतों मी त्यावेळीं ? पुढच्या

कादंबरीच्या मजकूराचा जर तुम्ही विचार करीत असाल,-तर मला त्यावेळीं काय वाटलं असेल, तें तुम्हींच लिहून काढा. खरं सांगायचं ह्मणजे, कसलाच, विचार करायला मला तेव्हां वेळ नव्हता. जर्मन माझ्या अगदीं जवळ होते. आणि पडून राहिलेल्या आपण, यांच्या समोर मरावं—ही कल्पनाच मला सहन होईना. मरायला—विशेषतः, तसं मरायला तर माझी बिलकुल तयारी नव्हती. मी पराकाष्ठेचा जोर करून गुडघ्यावर शरीर उचललं व हातांनी जमिनीचा आधार घेतला.

" " ते माझ्या जवळ येईपर्यंत, मी स्वतःच्या पायांवर उभा होतों. मला मनांतून अशी धास्ती वाटत होती, किं आपला जोर जाऊन गुडघे खचणार व आपण खालीं पडल्यावर, हे जर्मन आपल्यावर संगिनी चालविणार. आतां मला त्यांच्यापैकीं एकाचाही चेहरा आठवत नाहीं. गप्पा मारीत व हंसत खिदळत. ते माझ्या भोंवतीं गोळा झाले. " मारा ! दरोडेखोरांनों, मी खालीं पडायच्या आंत, मला ठार मारा ! " मी ओरडलों. त्यांच्यापैकीं एकानं मला रायफलचा फटका दिला—पण मी पुनः कसा बसा उभा राहिलों. ते एकदम खोः खोः करून हंसायला लागले व त्यांच्यापैकीं एकानं हात हालवून " चलो ! " म्हणून दर्शविलं. मी चालूं लागलों.

" माझ्या डोक्यावरील जखमेंतील रक्त माझ्या तोंडावर वाळल होतं: अजून उष्ण व चिकट असं रक्त ठिबकत होतं; माझा खांदा दुखत होता. आणि उजवा हात, माझ्यानं उचलवत नव्हता. माझ्या मनांत असं होतं किं कुठं न जातां स्वस्थ पडून रहावं—तरी मी चाललों होतों……… " छेः ! खात्रीनं माझ्या मनांतून मरायचं नव्हतं: इतकंच नव्हे तर कैदी म्हणून रहायची सुद्धां माझी तयारी नव्हती. मी शरिरांतील होता नव्हता, तेवढा सर्व जोर एकवटला व वेदना आणि थकवा, यांना दूर हटवून पावलं टाकूं लागलों. ह्मणजे माझ्यांत अजून जीव होता तर, ? मी काय करूं शकत होतों ह्मणायचा ! पण तहानेनं माझा जीव बेजार केला होता ! माझा घसा कोरडा पडला होता व पावलं जरी आपोआप पडत होतीं तरी प्रत्येक पावलागणिक माझ्या डोळयांसमोर अंधेरी येत होती. मला मूर्च्छा येईल किं काय असं दर क्षणाला वाटत होतं, ? पण मी मात्र मनांत विचार करीत होतों; " मला एकदां पाणी प्यायला मिळो व थोडा विसांवा मिळो किं यांच्या हातांवर तुरी दिल्याच समजा ! " " आमच्या

पैकीं ज्यांना पकडलं होतं अशा सर्वांना, रानाच्या कडेला, एका रांगेंत उभं करण्यांत आलं. त्यांतले कांही आमच्या शेजारच्या तुकडींतले होते; आमच्या— तीन नंबरच्या तुकडींतले दोघे जण होते. बहुतेक कैदी जखमी झालेले होंते.

"आमच्यांत कुणी कमिसार किंवा कमांडर्स आहेत कि काय, असं एका जर्मन लेफ्टनंटनं मोडक्या तोडक्या रशियनमध्यें विचारलं. आमच्यापैकीं कुणीच कांहीं उत्तर दिलं नाहीं. शेवटीं तो संतापून ओरडला "कमिसार्स आणि ऑफिसर्स— दो कदम आगे !" आमच्यांतला एकहीजण रेंसभर सुद्धां हालला नाहीं.

"लेफ्टनंट आमच्या रांगेपुढून सावकाश फिरला. त्यानं ज्यू सारख्या दिसणाऱ्या पंधरा—सोळाजणांना निवडून काढलं. "ज्यू आहेस का ?" असं त्यांच्यातल्या प्रत्येकाला खडसावून विचारलं—व उत्तराची वाट न पहातां त्यांना पुढं येण्याचा हुकूम फर्मावला. त्यानं निवडलेले लोक निव्वळ ज्यूच नव्हते— त्यांत आर्मेनियन व रशियन देखील होते. पण दिसायला ते धिप्पाड असून त्यांचे केंस काळे कुळकुळीत होते. त्यांना आमच्या पासून थोडं दूर नेण्यांत आलं व आमच्या डोळ्यांदेखत गोळया घालून ठार मारण्यांत आलं. नंतर आमची कसून झडती घेतली, आणि वह्या, नोट बुकं व इतर खाजगी वस्तू काढून घेण्यांत आल्या. सहसा माझं "पार्टी-कार्ड" मी नोटबुकांत ठेवीत नसे: नेहमीं तें माझ्या विजारीच्या आंतल्या खिशांत असे, त्यामुळं तें यांच्या नजरेंतून चुकलं. तसाच विचार करायचा तर, "माणूस हा मोठा विचित्र प्राणी आहे"... मला आतां हें पुरतं कळून चुकलं होतं कि माझी घटका भरली होती; कारण आतां जरी नाहीं, तरी फरारी होतांना मी पकडला जाणार व नंतर मरण ठेवलेलंच ! कारण जखमांमुळं माझी शक्ति क्षीण झाली असून, इतरांच्या बरोबर कूच करण्याची ताकद माझ्यांत राहिली नव्हती. तरी सुद्धां झडती नंतर आपल्याजवळ पार्टीकार्ड शिल्लक राहिलंय्, या एकाच गोष्टीचा मला इतका अवर्णनीय आनंद झाला, कि त्याच्या भरांत मी तहान देखील विसरलों.

"आमची पुन: रांग बनविण्यांत येऊन पश्चिमेला कूच करण्यास सांगण्यांत आलं. आमच्या दोन्ही बाजूला हत्यारबंद पहारेकरी होते, आणि शिवाय, डझन भर मोटर सायकलवाले आमच्या मागोमाग येत होते. आम्हांला झपझप चाल-

विण्यांत येत होतं—व क्षणागणिक माझी शक्ति कमी होत होती. दोनदां मी खालीं पडलों; पण दोन्ही वेळां मीं कसाबसा उठून चालूं लागलों: कारण मला उठायला जर मिनिटाचा उशीर झाला असता, तर सर्वजण पुढं गेले असते, व मला तिथल्या तिथं—रस्त्यांतच—गोळी घालून ठार मारण्यांत आलं असतं. माझ्या पुढं चालणाऱ्या सार्जंटवर तीच पाळी आली. त्याच्या पायाला जखम झाली असल्यानं, तो कसाबसा रखडत चालला होता. तो एकसारखा विव्हळायचा व मधून मधून किंकाळ्या फोडायचा; आम्ही जेमतेम एकादा किलोमीटर गेलों असेल नसेल तोंच तो ओरडला " छेः ! आतां नाहीं सहन होत ! अच्छा ! गुडबाय् ! कॉमरेडस् ! "—असं म्हणून तो रस्त्यांतच मटकन् बसला. " दुसऱ्यांनी त्याला हात धरून उठविण्याचा प्रयत्न केला पण व्यर्थ. तो पुनः खालीं बसला. स्वप्नांत एकाद्याला पहावं तसा त्याचा चेहेरा माझ्या डोळ्यासमोर येतो; त्याचं तें मोहक, पण फिकट पडलेलं तोंड, आंठ्या पडलेलं कपाळ, आणि दुःखाश्रूनं ओलावलेले डोळे, आम्ही पुढं चालून गेलों व तो मागं राहिला. मी मागं वळून पाहिलं, तों एक मोटार सायकलवाला अगदीं त्याच्या जवळ आला व सायकलवरूनच त्यानं पिस्तुल काढलं व त्याच्या कानशिलावर झाडलं. आम्हीं नदीवर जाईपर्यंत लाल—फौजेंतील जे शिपाई मागं पडले त्यांची सुद्धां अशीच वाट लावण्यांत आली. " आतां आम्हांला नदी दिसूं लागली: नदीवरचा पूल उध्वस्त केलेला दिसला: व नाक्याजवळच एक मोटारगाडी अडकून पडलेली होती. नेमका त्याच ठिकाणीं मी छातीवर धाडकन् पडलों. तुम्हांला काय वाटतं मला घेरी आली असेल ? छट् ! मी पडलों—माझ्या तोंडांत धुळ शिरली: मी रागानं दांत ओंठ आवळले—पण दातांखालीं धूळ सांपडत होती... मला उठतां येईना. आमचे कॉमरेडस् माझ्या पुढून कूच करीत होते. " चल, उठ लवकर ! " त्यांच्यांतला एकजण हल्क्या सुरांत कुजबुजला—" नाहीं तर ते तुला गोळी घालतील." मी तोंडांत बोटं घालून तोंड फाडण्याचा प्रयत्न केला; बुबुळं चेपून धरलीं—न जाणों या तीव्र वेदनांनी तरी मी उठेन असं मला वाटलं... ...

" आमचे लोक पुढं गेले होते व मागून येणाऱ्या मोटार सायकलचा आवाज मला ऐकूं येऊं लागला. जेमतेम खटपट करून मी उभा राहिलों !

मोटार सायकलवाल्याकडे लक्ष न देतां, मी एकाद्या दारूड्याप्रमाणं झोकांड्या खात चालूं लागलों व मोठ्या कष्टानं, शेवटच्या रांगेला येऊन मिळालों. रणगाडे मोटारगाड्या यांनीं नदी ओलांडल्यामुळं, नदीचा चिखल ढवळून निघाला होता व पाणी गढूळ झालं होतं. तरी आम्ही तें गरम पाणी अधाशाप्रमाणं पोटभर प्यायलों व आम्हांला तें स्वच्छ झऱ्यापेक्षां मधुर लागलं. त्या पाण्यांत मी माझं डोकं व खांदे बुचकळले. त्यानं मी ताजातवाना झालों मला आंगात नवीन जोम आल्यासारखं वाटूं लागलं. आतां मात्र मला असं वाटायला लागलं कि " मी कांही आतां रस्त्यांत मरत पडणार नाहीं.........

" आम्ही नदी ओलांडून थोडे फार गेलों असेल नसेल तों, आमच्या समोरून जर्मन रणगाड्यांची एक तुकडी आली. आम्हीं कैदी आहोंत हें पहिल्या रणगाड्याच्या ड्रायव्हरनं पाहिलं मात्र, लगेच त्यानं वेग वाढवून, रणगाडा सरळ आमच्या तुकडीवर घातला. पुढच्या रांगेंतील कांहीजण गाड्याखालीं सांपडून चेंगरले. हें पाहून मोटार सायकलवाले व इतर पहारेकरी, पोट धरधरून हंसू लागले; व रणगाड्याच्या पोटांतून मुंडकी काढून आमची गंमत पाहणाऱ्यांना उद्देशून कांही तरी ओरडले व हात हलवूं लागले. आमची रांग बनविली गेली. व आम्ही रस्त्याच्या कडेनं चालूं लागलों. खरोखर ! या जर्मनांची विनोद-शक्ति मोठी विचित्र आहे यांत शंकाच नाहीं.........

" त्या दिवशीं संध्याकाळीं व रात्रीं, मी विचार केला, आपल्या आंगात कुवत नाहीं, मग कशाला उगाच फरारी होण्याची खटपट करा ? याशिवाय आमच्यावर कडक पहारा ठेवला असून, पळण्याचा नुसता प्रयत्न करणं म्हणजेच डोकं गमावणं अशी स्थिती होती. पण मागाहून,—याच वेळीं मी पळालों नाहीं, म्हणून स्वतःलाच किती शिव्या दिल्या असतील कुणास ठाऊक ! दुसऱ्या दिवशीं, ज्या खेड्यांत एक जर्मन शिपायांची तुकडी राहात होती, त्या खेड्यांतून आमची वरात काढण्यांत आली. आमची गंमत पहायला, जर्मन शिपाई गोळा झाले, कि आमचा जर्मन अधिकारी " दौडो ! " म्हणून हुकूम सोडायचा. नुकतेच आघाडीवर येणाऱ्या नवीन जर्मन शिपायांसमोर, आमची बेअब्रू करायची, हा त्यांचा डाव होता...आम्ही त्या खेड्यांतून दौडत गेलों ! जो कुणी मागं

पडेल, त्याला तात्काल गोळी घालून ठार मारण्यांत येई. संध्याकाळच्या सुमारास आम्ही युद्धकैद्यांच्या कँपात पोंचलों.

" हा कँप म्हणजे मशीन–ट्रॅक्टर स्टेशनचं आवार असून, त्याच्या सभोंवार कांटेरी तारांचं कुंपण घालण्यांत आलं होतं. इथं कैद्यांची, खेंचून दाटी झाली होती. पोंचल्याबरोबर आम्हांला कँपगार्डोच्या हवालीं करण्यांत आलं, व त्यांनी बंदुकीच्या दस्त्यांनी आम्हांला आंत ढकललं. त्या कँपचं वर्णन करणं अशक्य आहे, कारण त्याला जरी नरक म्हटलं, तरी देखील तेथील घाणीची कल्पना येणं, कठीण होईल. पहिली गोष्ट म्हणजे तिथं संडास नव्हता; उभ्या उभ्याच प्रत्येकाला, तिथं शरीराचे सर्व व्यवहार करायला लागत होते, व नंतर त्याच घाणींत, बसावं किंवा पडावं लागत होतं. आमच्यांतले अशक्त होते ते, जे एकदां बसले ते बसलेच ! आम्हांला दिवसांतून एकदां, अन्न व पाणी देण्यांत येत असे...म्हणजे काय, तर कटोराभर पाणी व जेमतेम मूठभर डाळ ! बस्स. हेंच अन्न नि पाणी ! मध्यें कांही दिवस तर आम्हांला हें सुद्धां देण्यास अजिबात विसरले !......

" एक दोन दिवसांनंतर पाऊस पडायला लागला. आमच्या कँपमध्यें सगळीकडे गुडघाभर चिखल झाला होता. सकाळच्या वेळीं आम्हीं सगळे पावसानं ओलेचिंब झालेले असूं व त्यांतच उन पडल्यावर, भरधांव धावून आलेल्या घोड्याच्या आंगातून जशा वाफा निघाव्या तशा आमच्या आंगांतून निघत......पाऊस तर पळभरही थांबेना. दररोज रात्रीं चाळीस एक कैदी इहलोक सोडून जात. अन्नाच्या अभावीं, आम्हीं दररोज कमताकद होत चाललों. त्यांतून मी तर जखमांमुळं अगदीं बेजार झालों होतों.

" सहाव्या दिवसाच्या सुमारास, तर माझ्या डोक्याला व खांद्याला तीव्र वेदना होऊं लागल्या, कारण त्या आतां पिकल्या असून चिघळूं लागल्या होत्या. नंतर तर त्यांना घाण मारूं लागली. आमच्या कँपच्या जवळच, शेतांचें तबेले होते, व तिथं आमच्यांतील अत्यवस्थ शिपायांना ठेवण्यांत आलं होतं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी गार्डोच्या सार्जंटला भेटलों व जखमी शिपायां-पाशीं असलेल्या, डॉक्टरला–भेटण्याची परवानगी मागितली. त्या जर्मन सार्जंटला

रशियन चांगलं बोलतां येत होतं. जा, तुमच्या त्या रशियन डॉक्टरकडेच जा ! तो तुम्हांला चांगली मदत करील, " त्यानं उत्तर दिलं.

" त्यावेळीं त्याच्या बोलण्यांतली खोंच माझ्या लक्षांत न आल्यानं, मी आनंदित होऊन तडक, डॉक्टरला भेटायला गेलों.

" दारापाशींच मला सैन्याचा डॉक्टर भेटला. त्याला पाहिल्याबरोबरच माझी खात्री झाली किं, हा पठ्या कांही आतां फार दिवस जगत नाहीं. तो तर दुष्काळांतून आल्यासारखा दिसत होता. शरीर म्हणजे हाडांचा पिंजरा ! दगदगीनं व प्रत्यक्ष पाहिलेल्या प्रकारानें, जणूं वेड लागलेला, असाच तो मला दिसला. जखमी शिपाई आसपास पसरलेल्या खताच्या दुर्गंधींतच, लोळत पडले होते. बहुतेकांच्या जखमांतून किडे वळवळत होते, व ज्यांना थोडी फार शक्ति राहिली होती, ते नखांनी किंवा काड्यांनी, जखमांतून किडे बाहेर काढीत होते. त्यांच्या जवळच मेलेल्या कैद्यांची रास पडली होती. ती उचलायला अजून कुणाला फुरसत मिळाली नव्हती.........

" हें पाहिलंस ना ? मग सांग आतां, मी कसली कपाळाची मदत करणार तुला ? " डॉक्टर मला म्हणाला. " बँडेज तर दूर राहिलं पण माझ्या जवळ कांहीही नाहीं. बाबारे, कृपा करून इथून चालता हो पाहूं ! आणि तीं जखमां-वरील घाणेरडीं फडकीं सोडून टाक...त्या जखमांवर राख फेंक थोडीशी. दारा-जवळ पडलीय् राख.........

" मी, त्याचं म्हणणं ऐकलं. दारापाशींच पुनः तो जर्मन सार्जंट भेटला. माझ्याकडे पाहून तो हंसत होता. हं, मग काय झालं तुझं ? खरंच, तुमचा डॉक्टर मोठा चांगला आहे. केली कां त्यानं कांही मदत ?" त्याच्यांशीं चकार शब्द न बोलतां पुढं जाण्याचा माझा विचार होता; पण त्यानं माझ्या तोंडावर ठोंसा लगावून विचारलं, ए सुव्वर ! बोलत नाहींस काय तूं ? "— त्यासरशीं मी खालीं पडलों. पडल्याबरोबर त्यानं माझ्या छातीवर, डोक्यावर जी लाथा मारायला सुरवात केली...ती शेवटी तो दमला, म्हणून थांबली. माझ्या जिवांत जीव आहे तोपर्यंत, मी त्या जर्मन सार्जंटचा चेहरा विसरणार नाहीं. त्यानंतर त्यानं मला किती तरी वेळां मारलं. त्याचं माझ्याकडे लक्ष

गेलं रे गेलं, किं तो मला तारेच्या कुंपणांतून बाहेर काढायचा व शांतपणं नि पद्धतशीरपणं......एक चित्तपणानं बेदम बडवायचा.........

" मी हें सगळं सहन कसं केलं, याचं तुम्हांला मोठं आश्चर्य वाटत असेल नाहीं ? लढाईच्या खूप पूर्वी, यंत्रकामगार होण्याच्या आधीं, मी कामा नदीवर खलाशी होतों. त्यावेळीं एक हंड्रेडवेट वजनाचीं अशीं दोन मिठाचीं पोतीं, मी सहज पाठीवरून नेत असें. खरोखरच, मी फार मजबूत आहे. माझी कसलीही तक्रार नाहीं, आणि माझी शरीर प्रकृति अतिशय दणकट आहे. पण त्यावेळीं जर कोणची महत्वाची गोष्ट असेल, किं ज्याच्या जोरावर मी हे सगळे अत्याचार सहन केले, तर ती म्हणजे माझी दांडगी ईच्छा शक्ति. माझ्या मनांतून मरायचं नव्हतं...व माझी प्रतिकार करण्याची इच्छा तशीच दांडगी होती. आपल्या देशासाठीं लढणाऱ्या माझ्या लोकांत, मला परत जायचं होतं—आणि सरते शेवटीं माझ्या शत्रूंवर पुरेपुर सूड उगवायला मी आमच्या लोकांना पुनः येऊन मिळालों सुद्धां !—

" हा कँप म्हणजे गडबड उडविणारांचा अड्डा आहे, असं त्यांना वाटल्यावरून, मला, शंभर किलोमिटर लांब असलेल्या, दुसऱ्या कँपात पाठविण्यांत आलं. हा कँपसुद्धां पहिल्यासारखाच होता. सभोंवार उंच खांब व कांटेरी तारांचं कुंपण, व वरतीं छप्पर वगैरे कांही नाहीं. अन्नसुद्धां थेट तसंच—फरक इतकाच किं अर्धकच्च्या डाळी ऐवजीं, कसलं तरी उकडलेलं धान्य मिळे—कधींकधीं तर ते एकाद्या मेलेल्या घोड्याचा सांगाडा आणून टाकीत. कैद्यांनी मग वाटेल तशी आपसांत वांटणी करून घ्यावी ! उपासमार टाळण्यासाठीं आम्हीं तें देखील खायला कमी केलं नाहीं—पण आमच्यांतले शेंकडों लोक मृत्युमुखीं पडले. दुष्काळांत तेरावा महिना यावा, त्याप्रमाणं नेमकी याच वेळेला थंडी पडूं लागली. ऑक्टोबरच्या पावसानं संततधार धरली होती—आणि त्यांतून सकाळीं थंडीचा कडाका ? आमचे या थंडींत भलतेच हाल झाले. शेवटीं मी, एका मेलेल्या शिपायाच्या आंगावरचं कुडतं नि कोट काढून घेतला, पण त्यानींसुद्धां थंडी वाजणं कमी होईना. आतां उपास काढणं आमच्या आंगवळणीं पडलं होतं.

. "आमच्या गार्डांना मात्र व्यवस्थित जेवण मिळे...जें हाताला लागेल तें लुबाडून, त्याच्यावर ते गलेलठ्ठ झाले होते. पहावें तों सगळे एका माळेचे मणी ! जगांतले सुप्रसिद्ध डाकूच एकत्र आले होते म्हणाना. त्यांची करमणुकीची कल्पना अशी. सकाळीं एकजण कुंपणाजवळ येऊन दुभाष्याकरवीं सांगायचा, "आतांच, शिधा—जेवण मिळणार आहे—तें डाव्या बाजूनं वाटलं जाईल." असं बोलून तो निघून जाई. आमच्यापैकीं, ज्यांना ज्यांना म्हणून उभं राहतां येत होतं, ते सगळे डाव्या बाजूला जाऊन रांगेंत उभे राहत. अशा रितीनं आम्ही शेंकडों-जण, एक तास, दोन तास—तर कधीं, तब्बल तीन तास ताटकळत उभें राहत असूं. आम्ही थंडीवाऱ्यांत कुडकुडणारे हाडांचे सांपळे होतों ! कितीतरी वेळ अशा रीतीनं वाट पाहण्यांत जाई.........

"एकदम विरुद्ध बाजूनं जर्मन यायचे, व कुंपणांत, घोड्याच्या, मांसाचे तुकडे फेंकायचे. मग काय विचारतां ! भुकेनें तडफडणारा तो कैद्यांचा जमाव धक्काबुक्की करून त्याच्यावर नुसता तुटून पडायचा. चिखलानं माखलेल्या घोड्याच्या मांसाच्या तुकड्यासाठीं लोक हमरीतुमरीवर यायचे."

"हें पाहून जर्मन खोः खोः हंसत सुटायचे. त्यानंतर कितीतरी वेळ मशीनगनचा मारा व्हायचा; कण्हणं, विव्हळणं, किंकाळ्या यांचे आवाज उठायचे; जखमी व मेलेल्यांना तसेच सोडून कैदी डाव्या बाजूला धांवायचे......... त्यानंतर, कँपचा सुपरिंटेंडेंट, तो हडकुळा फर्स्ट लेफ्टनंट, दुभाष्याला घेऊन कुंपणाजवळ यायचा. कसंबसं हंसं आंवरीत तो म्हणायचा.

"अन्न वांटण्याच्या वेळीं एक निर्लज्ज प्रसंग घडला, असं मला कळलं आहे. याद राखा, डुकरांनों, पुनः जर असं कधीं झालं, तर मी तुम्हां सगळ्यांना गोळ्या घालून ठार करीन—बिलकुल गय करणार नाहीं. आतां या जखमी व मेलेल्या लोकांना उचलून न्या !" हें ऐकून त्याच्या मागं उभे असलेले जर्मन अधिकारी पोट फुटेपर्यंत हंसत. अशा तऱ्हेचा "विनोद" त्यांना मनापासून आवडे. "मुकाट्यानं आम्ही मेलेल्यांना ओढून, आवाराबाहेर जवळच्या एका खड्डयांत पुरून टाकीत असूं.

" या कँपमध्यें आम्हांला दररोज मारण्यांत येई. बुक्या, काठ्या, बंदुकीचे दस्ते हीं सर्व हत्यारें वापरलीं जात. कधीं कधीं तर आतां अगदीं कंटाळा आला—वेळ जात नाहीं. म्हणून ते आम्हांला मारीत तर कधीं करमणुकीखातर. माझ्या जखमा आतां बऱ्या होत आल्या होत्या पण ओलामुळं म्हणा, किं मारामुळं म्हणा, त्या पुनः वाहूं लागल्या व मला कळा सहन होईनात. पण तरीसुद्धां—त्यांतून सुटण्याची प्रबल ईच्छा असल्यानं, मी तें सर्व मुकाट्यानं सहन केलं. आम्ही त्या चिखलांतच निजत असूं—कारण आम्हांला गवतसुद्धां देण्यांत आलं नव्हतं. तसेच आम्ही एकमेकाला बिलगून झोंपा काढीत होतों. रात्रभर आमची उलथापालथ होत असे. कारण खालीं चिखलांत असलेले गारठ्यानं वर येत व वरचे खालीं सरकत. झोंप व विश्रांति याऐवजीं, आम्ही हाल मात्र काढीत होतों.

" एखाद्या वाईट स्वप्नाप्रमाणं, एका मागोमाग दिवस जात होते व दररोज माझी अशक्तता वाढतच होती. एखाद्या लहान पोरांतसुद्धां माझ्यापेक्षां अधिक जोर असेल असं वाटलं मला, त्यावेळीं ! कधीं कधीं हातापायांच्या काड्याकडे लक्ष जाऊन माझ्या मनांत विचार येत " मी कसा बरं या कचाट्यांतून बाहेर पडणार ? "—आणि मग मला वाटे " किती वेडा आहे मी ! पहिल्याच दिवशीं पळालों असतों तर ? समजा, मला त्यांनीं जर मारलं असतं, तर निदान या अमानुष हालांतून तरी सुटलों असतों......... "

" हिंवाळा आला. बर्फ झाडून, आम्ही गारठलेल्या जमिनीवर झोंपूं लागलों. आमची संख्या आस्ते आस्ते कमी होत चालली होती. शेवटीं असं सांगण्यांत आलं किं, थोड्याच दिवसांत आम्हांला कामाला लावण्यांत येणार. आम्हांला तितकाच हुरूप आला. प्रत्येकाला आशेचा किरण दिसूं लागला. कारण, कामाच्या वेळीं कसं तरी पळतां येईल, हीच ती आशा........."

" त्या रात्रीं अतिशय थंडी पडली असून सर्वत्र सामसूम होती. पहांटेस, तोफखान्याचा आवाज आमच्या कानीं पडला. आमच्या भोंवतालचे लोक खडबडून जागे झाले. पुनः तोफांचा आवाज ऐकूं आल्याबरोबर कुणी तरी ओरडला, " कॉमरेड्स ! हा आपला तोफखाना आहे ! आपल्या फौजा हल्ला चढवीत आहेत ! " यानंतर जें काय घडलं, त्याची कल्पना करणं अशक्य आहे. तमाम

कँप खडबडून जागा झाला होता; चार चार दिवस ज्यांना जागचं हालतां येत नव्हतं, असे लोकसुद्धां नवीन जोर चढल्याप्रमाणं ताडकन् उठून उभे राहिले. भोंवतालीं सर्वत्र घाईघाईनं चाललेली कुजबुज, व हुंदक्यांचा अस्पष्ट आवाज घुमत होता. माझ्या शेजारींच कुणी तरी रडत होतं—हो, एकाद्या बाईप्रमाणं रडत होतं—कुणी कशाला ! मीसुद्धां–हो मीसुद्धां—" हें बोलतांना लेफ्टनंट गेरासिमोवचा कंठ भरून आला होता. जरावेळ तो तसाच शांत बसला, नंतर हलक्या आवाजांत बोलूं लागला, " माझ्या डोळ्यांतून घळघळ अश्रू वहायला लागले व त्या थंडगार वाऱ्यांत गालांवरच थिजले,.........कुणीतरी हलक्या सुरांत " आंतरराष्ट्रीय गीत " म्हणण्यास सुरुवात केली. लगेच आम्ही सर्वांनीं पिचक्या आवाजांत त्याला साथ दिली. हें पाहून पहारेकऱ्यांनीं आमच्यावर गोळीबार केला. " खालीं पडा ! " लगेच हुकूम सोडण्यांत आला; ताबडतोब बर्फावर पडून, मी एकाद्या पोरासारखा रडूं लागलों. पण ते अभिमान व आनंद-मिश्रित अश्रू होते. आम्हांला आनंद झाल्याची, व आमच्या जाज्वल्य देशाभिमानाची साक्ष होती ती ! जर्मन आम्हांला मारूं शकत होते—कारण आधींच आम्ही निशस्त्र, व त्यांतून भुकेनं कासावीस झालेले, पण आमची जाज्वल्य तत्वनिष्ठा व देशाभिमान याला, ते मारूं शकत नव्हते व कधींच शकणार नाहींत ! नसं जर त्यांना वाटत असेल तर ती त्यांची खुळी समजूत आहे; मी खरं सांगतों " आम्ही वांकणार नाहीं ! "

× × ×

" लेफ्टनंट गेरासिमोवच्या गोष्टीचा शेवट, त्या रात्रीं मला ऐकायला मिळाला नाहीं. कारण त्याला मुख्य कचेरींतून तांतडीचं बोलावणं आलं होतं. कांही दिवसांनी, पुनः आम्ही एकत्र आलों. खंदकांत, पाईन झाडाचा वास सुटला होता. तो एका बांकावर बसला असून, तो किंचित पुढं वांकला होता. त्याची दणकट मणगटं गुडघ्यांवर टेंकलीं असून, हातांची बोटं एकांतएक अडकविलीं होतीं. मला त्याच्याकडे पाहिल्यावर वाटलं, किं कँपमध्यें कैदी असतांना त्याला असंच शांत, खिन्न चेहऱ्यानं, तासूनतास् निष्फळ विचार करीत बसण्याची संवय लागली पाहिजे......

" मी फरारी कसा झालों, तें तुम्हांला ऐकायचं असेल नाहीं कां ? " त्याचं असं झालं. ज्या रात्रीं आम्हांला तोफांचे आवाज ऐकूं आले, त्यानंतर लगेच आम्हांला, तटबंदीची डागडुजी करण्याचं काम, देण्यांत आलं. सगळीकडे अतिशय थंडीमुळं बर्फ पडलं होतं. पाऊस तर सारखा पडे; कँपच्या उत्तरेकडे, आम्हांला नेण्यांत आलं. मागं जे आम्हीं पाहिलं त्याचीच उजळणी पुनः रस्त्यांतून चालतांना झाली, जे लोक थकल्यामुळं खालीं पडले त्यांना ताबड-तोब गोळ्या घालण्यांत आल्या—व त्यांची प्रेतं तशीच टाकण्यांत आलीं......

" आमच्यापैकीं एकजण एक गारठून गेलेला बटाटा उचलीत आहे असं पाहून, जर्मन अधिकाऱ्यानं त्याला ताबडतोब गोळी घातली. आम्ही बटाट्याच्या शेतांतून चाललों होतों. गोंचार नांवाच्या एका उक्रानियन सार्जण्टनं तो बटाटा उचलला; त्याला तो दडवायचा होता, जर्मन अधिकाऱ्यानं हे पाहिलं मात्र. तो कांही एक न बोलतां, गोंचार जवळ गेला व त्याच्या डोक्याच्या मागच्या बाजूवर गोळी झाडली.

" ठेहरो ! पुनः रांग बनवा ! " असा हुकूम सोडण्यांत आला. सभोंवार हात फिरवीत तो जर्मन अधिकारी ओरडला, " ही सर्व जर्मन मालमत्ता आहे. परवानगीशिवाय, जर तुम्ही कुणी कशाला हात लावलात, तर तुम्हांला ठार मारण्यांत येईल "...

" वाटेंत आम्हांला एक खेडं लागलं. गांवात आम्हीं शिरतों तोंच, तिथल्या बायकांनीं, आमच्यावर पावाचे तुकडे व भाजलेले बटाटे फेंकले. आमच्यापैकीं कांही जणांनी ते शिताफीनं उचलले; कांही जणांना उचलतां आले नाहींत. पहारेकऱ्यांनी, घरांच्या खिडक्यांवर गोळीबार केला व आम्हांला झपाझप चालण्याचा हुकूम सोडला. पण ती पोरं ! त्यांना कोण घाबरविणार ? ती आमच्या पुष्कळ पुढं जाऊन रस्त्यांत पावाचे तुकडे मांडून ठेवूं लागलीं— त्यामुळं आम्हांला ते अनायासं मिळत. मला आठवतं, किं मलासुद्धां एक चांगला मोठा बटाटा मिळाला; माझ्या पुढं चालणाऱ्यांनी व मी—आम्ही दोघांनी, तो सालासकट मटकाविला, व तो त्यावेळीं आम्हांला, इतका गोड लागला !

" हें डागडुजीचं काम रानांत होतं. आमच्या वगील गार्डांची संख्या वाढविण्यांत आली होती. आम्हांला फावडीं दिलीं होतीं. पण या चोराचं बांधकाम करण्याची इच्छा, माझ्या मनाला शिवली नाहीं. माझ्या मनांत त्यांची नासधूस करावयाची होती.

" संध्याकाळीं मी निर्धार केला. आम्ही जो खड्डा खणीत होतों त्यांतून मी बाहेर पडलों; फावडं, डाव्या हातांत घेतलं व गार्डाजवळ गेलों. जे थोडे जर्मन होते, ते बऱ्याच अंतरावर असून, या एकट्या एक गार्डाशिवाय आमच्या आसपास चिटपांखरू नव्हतं, हें मी नीट हेरलं होतं......

" हें पहा, माझं फावडं मोडलंय्, " मी त्याच्याजवळ जातांजातां, पुटपुटलों. माझ्या मनांत विचार आला कि, " पहिल्या फटक्यांतच जर याला आपण लोळवला नाहीं, तर सर्वच कारभार आटोपला ! " माझ्या तोंडावर. त्याला कांही तरी संशय येण्यासारखं दिसलं असलं पाहिजे, कारण त्यानं. कमरेचं पिस्तुल काढण्यासाठीं, खांद्याची हालचाल केली. पण मी ताबडतोब त्या फावड्याचा असा सज्जड टोला हाणला त्याच्या तोंडावर ! माझ्या मनांतून त्याच्या डोक्यावरच फटका हाणायचा होता पण त्याच्या डोक्यावर शिरस्त्राण असल्यानं, माझा नाइलाज झाला. पण माझ्यांत बरीच ताकद शिल्लक होती म्हणायची, कारण तो हूं का चूं न करितां धाडकन्......

" माझ्याजवळ पिस्तुल तीन काडतूसं होतीं. मी धांवायला लागलों खरा, पण माझ्यानं धांववेना, कारण माझी सर्व शक्ति खलास झाली होती. मी जरा वेळ थांबून दम घेतला, व पुनः हळूहळूं, पळायला लागलों. आमच्या पलीकडचं जंगल दाट असल्यानं, त्याच्या रोखानं मी धांवत होतों. मी कितीदां पडलों, नि उठलों, हें कांही आतां मला नीटसं आठवत नाहीं. पण प्रत्येक क्षणाला दूरदूर चाललों होतों. धांवपळीनं दम लागलेला, अर्धवट हुंदके येताहेत अशी माझी स्थिती होती. टेंकडी पलीकडच्या झाडांच्या राईजवळ मी पोंचलों नसेल तोंच, मागाहून मशीनगनचा आवाज व आरडाओरड ऐकूं आली. पण मला पकडणं हें आतां ईतकं सोपं राहिलं नव्हतं......

" काळोख पडायला सुरुवात झाली होती, पण माझ्या पावलांवरून माग काढीत जर जर्मन जवळ येऊन ठेपले तर ?...तर, शेवटचं काडतूस मी खास माझ्यासाठीं राखून ठेवलं होतं. या निश्चयानं, मला एक प्रकारचं समाधान आलं व मी सावकाश व काळजी पूर्वक चालूं लागलों......

" ती सबंध रात्र मी रानांत काढली. तिथून सुमारं अर्ध्या–किलोमिटरवर एक गांव आहे हें मला माहीत होतं, पण तिथं जाण्याची, मला भीति वाटूं लागली कारण न जाणों तिथंच जर्मन असायचे.

" दुसऱ्या दिवशीं मला कांही रशियन आढळले. त्यांच्या खंदकांत, मी बरं वाटेपर्यन्त राहिलों. पहिल्या पहिल्यानं,—मी जरी त्यांना पार्टीकार्ड दाखविलं,—तरी त्यांना माझा संशय येत होता. कॅंपमध्यें असतांना, मी माझं पार्टीकार्ड, कोटाच्या अस्तरांत शिवून टाकलं होतं. पण मी जेव्हां त्यांच्या बरोबर हालचालींत भाग घेऊं लागलों, तेव्हां माझ्याबद्दलचं त्यांच मत बदललं. तिथं असल्यापासूनच, मी मारलेल्या जर्मनांचा हिशेब ठेवायला सुरुवात केली: व अजून पर्यंत मी तो काळजीपूर्वक ठेवीत आहे; हळूहळू, आंकडा शंभराच्या वरांत येत चालला आहे.

" आमच्या लोकांनीं जानेवारींत, मला गुप्त रितीनं हद्दीपलीकडे नेलं. जवळजवळ महिनाभर मी हॉस्पिटलमध्यें पडून होतों. तिथंच माझ्या खांद्यात घुसलेला गोळयाचा तुकडा काढण्यांत आला–पण कॅंपमध्यें जडलेला संधिताप बरा व्हायला मात्र, लढाईनंतर वाट पहायला पाहिजे. हॉस्पिटल मधून विश्रांति-साठीं मला घरीं पाठविण्यांत आलं. घरीं मी फारतर आठवडाभर असेन. त्याच्यापुढं मला घरीं करमेनासं झालं. परत इथं निघून, कधीं येतों असं मला झालं. कारण शेवटपर्यंत, हेंच माझें घर आहे.

" खंदकाच्या दाराशीं आम्हीं एकमेकाचा निरोप घेतला. उन्हांत चम-कणाऱ्या त्या रानाकडे, विचारपूर्वक दृष्टिनं पहात लेफ्टनंट गेरासिमोव म्हणाला:

" आतां आम्हीं लढायचं कसं, द्वेष कसा करायचा, प्रेम कसं करायचं, हें फार चांगलं शिकलों आहोंत. युद्ध हा सर्व प्रकारच्या भावनांना तीक्ष्ण धार

देणारा दगड आहे. तुम्हांला कदाचित् असं वाटेल, कि प्रेम आणि द्वेष हे जोडीनं कसे राहूं शकतील ? तुम्हांला जुनी म्हण आठवत असेल—" चपळ घोडा आणि भेकड कुत्रं यांची दावण कशी बांधणार ?"...पण इथं पहाल तर प्रेम आणि द्वेष यांची नुसती एकत्र दावण बांधलेली नाहीं, तर ते चांगले जोरानं ओढताहेत ! जर्मन म्हटला कि त्वेष, द्वेष, संताप याच्यामुळं माझ्या आंगाची लाही लाही होते—कारण त्यांनीं, माझे व माझ्या देशबांधवांचे, हालहाल केले आहेत—त्याबरोबरच, माझं माझ्या देशबांधवांवर निरतिशय प्रेम आहे, व माझे लोक जर्मन जोखडाखालीं, कधींही हालअपेष्टा काढीत, राबूं नयेत, अशी माझी मनापासून इच्छा आहे. यामुळंच आम्ही सर्वजण चवताळून लढत आहोंत; या दोन (परस्परभिन्न) भावनांचा कृतींत झालेला मिलाफ, आम्हांस विजयी करील. आमचं देशप्रेम, जरी आमच्या जिवांत जीव आहे तोपर्यंत, अंतःकरणांत तेवत असलं, तरी आम्हीं, आमच्या संगीनींची टोकं, द्वेषांत बुडवलेलीं आहेत. मी कदाचित पाल्हाळिकपणानं बोललों असेल, तर क्षमा करा, पण मला जें वाटतं तें मी बोललों..." हें बोलल्यावर, आमच्या भेटींत, पहिल्यानंच तो हंसला. त्याचं हास्य म्हणजे एकाद्या लहान मुलाप्रमाणं निरागस होतं.

आतां प्रथम माझ्या लक्षांत आलं कि, ओक वृक्षाप्रमाणं, अनेक हाल अपेष्टांना, व दुर्धर प्रसंगांना बेडरपणानं तोंड देणाऱ्या, करारी मुद्रेच्या, अवघ्या बत्तीस वर्षांच्या, या लेफ्टनंटच्या, कपाळाच्या बाजूचे केंस रुपेरी झाले होते. अतोनात हाल अपेष्टांवर, विजय मिळवून आलेल्या, त्या केंसाची ती धवलता इतकी शुद्ध होती, कि त्याच्या ट्रेंचकॅपवर अडकलेल्या कोळ्याच्या घराचे, पांढरे शुभ्र धागे, त्यांच्यात बेमालुम मिसळून चमकत होते. मी किती तरी वेळ कोळ्याच्या घराचे धागे कोणते, व त्याचे पांढरे शुभ्र रुपेरी केंस कोणते, हें शोधक दृष्टीनं न्याहाळलं, पण व्यर्थ !



## द्वेषाचं समर्थन : : : : ६

" इतर सर्व रशियनांपेक्षां, नाझीवादाचे प्रणेते दस्तयेव्स्कीकडे, अत्यंत सहिष्णुतापूर्ण नजरेनं पहातात. या थोर लेखकानं, नैतिक यातनांचीं जीं दृश्यं रंगविलीं आहेत, तीं नाझींना आवडतात: ज्या साहित्यिकानं, मानवी अंतरंगातील घनांधकाराचा भाग, प्रेम व दयेच्या ज्योतिनें उजळला, अशा दस्तयेव्स्कीच्या लिखाणाचं मर्म, समजणं, नाझींच्या आंवाक्याबाहेरचं आहे. " दस्तयेव्स्की म्हणजे छळाचं समर्थन होय "—असं एका जर्मन समीक्षकानं, एका मासिकांतील लेखांत म्हटलं आहे. किती मूर्खपणाचे व जहरी उद्‌गार हे ! दस्तयेव्स्कीचा निर्वाळा देऊन हिटलरवादी, हिमलरचं समर्थन करण्याचा उपद्व्याप करीत आहेत. सोन्याची त्यागशील वृत्ति, ग्रुन्याचा प्रेमळ स्वभाव, या गोष्टी ध्यानांत येण्यास, ते असमर्थ आहेत. रशियनांचं त्यांना काडीइतकं ज्ञान नाहीं.

जात्याच रशियन हा, सौजन्यशील, लवकर शांत होणारा, दुसऱ्याची बाजू समजून घेणारा, व क्षमाशील, वृत्तीचा आहे, नेपोलियनच्या पराभवा नंतर

जे रशियन शिपाई, पारिसमध्यें होते, त्याविषयींच्या आठवणी लिहितांना, कित्येक फ्रेंच लेखक असं म्हणतात, किं रशियन शिपाई, फ्रेंच स्त्रियासाठीं पाणी वाहून नेण्याचं काम करीत, त्यांच्या मुलाबाळांशी नाचत बागडत, व पारिसच्या गरीबगुरीबांच्या मांडीला मांडी लावून जेवणखाण करीत. इतकंच काय परंतु, ज्यावेळीं रशियावर परकीय शत्रूचा हल्ला झाला, त्या काळांतसुद्धां, रशियन लोक, युद्ध कैद्यांशी परोपकारी वृत्तीनं वागत. पोल्तावाला, जेव्हां स्वीड लोकांचा पराभव झाला, त्यानंतर, पीतर दी ग्रेट हा युद्धकैद्यांशी दयाळूपणानं बोलला. नेपोलियनच्या सैन्यांतील एक अधिकारी, सॉवेज, हा आपल्या १८१२ सालच्या आठवणींत म्हणतो, " रशियन म्हणजे सुस्वभावी मुलं आहेत."

सुमारें दहावर्षापूर्वी, मी त्रान्ससिल्वेनियांतील, ओरादिआ मारे या शहरीं गेलों. दुकानं, हॉटलं, कारखाने या ठिकाणीं रशियन समजणाऱ्या लोकांची संख्या पाहून मला मोठं आश्चर्य वाटलं. गेल्या महायुद्धांत, रशियनांनी, या शहरांतील पुष्कळशा रहिवाशांना युद्धकैदी म्हणून पकडलं होतं, असं आढळलं, सायबिरिया व मध्य आशिया, या ठिकाणच्या सुखद स्मृती आठवून ते सर्व किती तरी वेळ बोलत असत. सर्वांनी हें कबूल केलं किं रशियन आमच्याशीं मनमोकळेपणानं व दयाळुपणानं वागले. या युद्धाच्या प्रारंभीं, आमचे लोक युद्ध कैद्यांशी, निवांतपणं गप्पा गोष्टी करतांना, त्यांच्याबरोबर जेवतांना, धूम्रपान करतांना, मी कित्येकवेळां डोळ्यांनीं पाहिलं आहे. असं जर आहे, तर मग सोवियत जनतेच्या मनांत, नाझींबद्दल इतका ज्वलज्जहाल द्वेष बाणला कसा ?

द्वेष करणं, ही रशियनांची मनोप्रवृत्ति कधींच नव्हती. ही गोष्ट कांही आपोआप झाली नाहीं. छट् ! आमच्या जनतेच्या मनांतील, नाझी द्वेषाचा जन्म हाल, अपेष्टा,—यातनांत झाला आहे. हें युद्ध सुरु झाल्या बरोबर, आमच्यापैकीं पुष्कळांना असं वाटलं किं, हें युद्ध म्हणजे काय इतर युद्धं झालीं त्यांतलंच एक. आमची अशी समजूत होती किं आमच्यावर हल्ला करणारे सैनिक म्हणजे, आमच्यासारखीं माणसं, फक्त...त्यांचा गणवेश आमच्यापेक्षां निराळा. मानवी बंधुभाव व एकजूट यांच्यासारख्या उच्च तत्वांच्या वातावरणांत आम्हीं वाढलों होतों. शब्द सामर्थ्यावर आमचा विश्वास होता; आमच्यांतील

अनेकांना हें समजलं नाहीं, किं आमच्याशीं लढणारीं, ही माणसं नसून, भयानक, शिसारी आणणारे असे नरराक्षस होते, व अशा फॅसिस्टांशी निर्दयपणानं वागणं, हाच खऱ्या माणुसकीचा धडा होय. हिटलर नाझींना एकच भाषा समजते व ती म्हणजे बॉम्ब ?

रशियन भाषेंत अशी एक म्हण आहे किं " शिकारी कुत्र्याचे जिथं समर्थन करतां येईल, तिथं नरभक्षकांचं करतां येणार नाहीं "...या म्हणींत न्यायी व अन्यायी युद्धांबद्दल रशियनांना काय वाटतं, तें स्वच्छपणं प्रतिबिंबित झालं आहे. चवताळलेल्या लांडग्याला ठार मारणं वेगळं, व एकाद्या माणसावर हात उगारणं वेगळं. आपणांवर चवताळलेल्या लांडग्यांचा हल्ला झाला आहे, ही गोष्ट आतां, प्रत्येक सोवियत स्त्री–पुरुषाला कळली आहे.

एकादा रानटी माणूस, सर्वांगसुंदर पुतळ्याचा चक्काचूर करील; जेथं नरमांसभक्षकांची वस्ती आहे, अशा बेटावर जर एकाद्या जगप्रसिद्ध शास्त्रज्ञानं पाऊल टाकलं, तर एकादा नरमांसभक्षक त्याचा फराळ करून, पोटावरून हात फिरवील; पण जर्मन फॅसिस्ट हे शिकलेसवरलेले रानवट असून, जाणूनबुजून बनलेले नरमांसभक्षक आहेत. अलिकडे, जर्मन शिपायांच्या डायऱ्या चाळतांना, मला असं आढळलं किं, या शिपायानं क्लिनच्या कत्तलींत जातीनं भाग घेतला असून, त्याला "संगीताचा" शोक होता व विशेषतः "चैकोव्स्कीवर" तर तो बेहोष खूष होता. या प्रख्यात संगीत कलावंताच्या, घरादाराची धूळदाण करीत असतां, आपण काय करीत आहों, याची या जर्मन शिपायाला पुरेपुर जाणीव होती. नोव्गोरोद शहराची राखरांगोळी करीत असतां, जर्मन शिपायांनीं, "नॉगर्ट–( जर्मन नोव्गोरोदला "नॉगर्ट" म्हणतात, ) नगरीच्या शिल्प-सौंदर्याची तोंडफाटेपर्यंत स्तुती केली आहे."

एका मेलेल्या जर्मन शिपायाच्या खिशांत, रक्तानं माखलेली, लहान मुलाची विजार, व त्याच्या स्वतःच्या लहान मुलांचा फोटो, अशा दोन्ही वस्तू आम्हांला आढळल्या. त्यानं रशियन मुलाची कत्तल केली, पण त्यांच्या मुला-वर त्याचं प्रेम होतं यांत संशय नाहीं. जर्मनांच्या दृष्टीनं पहातां खून, हें डोकं फिरल्याचं लक्षण नसून, आगाऊ ठरविलेल्या गोष्टीची परिपूर्तता आहे. किएव-

मधील हजारों मुलांची कतल केल्यानंतर एक नाझी लिहितो, " आम्ही, एका भयंकर जातीचं बीं चिरडून टाकीत आहों... ..."

अर्थातच्, जर्मन शिपायांत देखील, चांगले व वाईट, असे दोन्ही तऱ्हेचे शिपाई आहेत हें खरं; पण, अमूक एका नाझीचे हे मानसिक गुणदोष आहेत. किंवा नाहींत, हा मुद्दाच नव्हे. " चांगले जर्मन ", जे जर्मनींत असतांना, मोठे भावनाविवश असतात, मुलांना कुरवाळतात, त्यांची पाठ थोपटतात, आपल्या रेशनांतले मांसाचे तुकडे, मांजरांना घालतात, तेच, " चांगले जर्मन, " रशियन मुलाबाळांची कतल, "वाईट जर्मन" जशी करतात–अगदीं थेट तशीच करीतात. ते खून कां करतात ? तर, या जगावर रहाण्यास लायक जर कुणी असतील, तर ते फक्त अस्सल रक्ताचे, जर्मन लोकच, यावर त्यांचा विश्वास बसला असतो म्हणून !

युद्ध सुरु झाल्यानंतर, एका नाझीयुद्ध कैद्याला, मी एक हस्तपत्रक दाखविलं. हें हस्तपत्रक, म्हणजे आम्हीं अगदीं प्रथम जीं छापलीं, त्यापैकीं होतं. मध्यरात्रीं, शांतपणें झोंपलेल्या माणसाच्या बिछान्यावर, जर जर्मन बॉंब पडूं लागले, तर तो जसा सहज, एकदम खडबडून जागा होईल, थेट तोच सूर या पत्रकाचा होता. त्यांत असं म्हटलं होतं किं जर्मनांनीं, आमच्या देशावर, क्रूरपणानं निष्कारण, हल्ला केला असून, ते अन्यायानं लढत आहेत. त्या नाझीनें तें पत्रक वाचलं, खांदे हलविले व म्हणाला " मला यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं. " न्याय–अन्याय या गोष्टींत त्याला कांहींएक अर्थ दिसला नाहीं. कारण तो उक्राइनमधील डुकरांचं मांस मटकावण्यासाठीं बाहेर पडला होता; दुसऱ्या राष्ट्रावर चढाई करणं, हें कांहीं तरी बनविण्याचं एक साधन आहे, हें ऐकून ऐकून, त्याच्या कानठळ्या बसल्या होत्या. तो, जर्मनीला, " महत्वाचे भाग " जोडण्यासाठीं, बायकोला " पायमोजांची लूट " आणून देण्यासाठीं, रणांगणावर दाखल झाला होता.

आम्हांला जर कशाचं विशेष आश्चर्य वाटलं असेल, तर तें म्हणजे, जर्मन लूटमारींतील, पद्धतशीरपणा व चलाखी पाहून ! ही लूटमार, म्हणजे एकाददुसऱ्या चोराभुरट्याची उचलेगिरी नव्हे; तर ज्या तत्त्वावर, हिटलर फौज उभारली गेली

आहे, तें मवाली गुंडगिरीचं तत्त्व आहे. या लूटमारीच्या मोहिमेंत, प्रत्येक जर्मन शिपाई, व्यक्तिशः मन घालीत आहे. हिटलर नाझींसाठीं, जर मला कुणी पत्रक लिहायला सांगितलं, तर, "तुम्हांला (डुकराचं) मांस मिळणार नाहीं," हे पांच शब्द फक्त लिहीन. कारण, त्यांना जर कांहीं कळण्याची कुवत व इच्छा असेल, तर तें हेंच.

जर्मन शिपायांच्या डायऱ्यांतून, त्यांनीं काय काय लुटलं, याची यादी वाचायला मिळते. आपण किती कोंबडींची पिलं मटकावलीं, किती ब्लँकेटं चोरलीं, याचा ते हिशेब ठेवतात. ते लूटमार करीत असतांना, सद्सद्विवेक-बुद्धिची टोंचणी, वगैरे प्रकार त्यांच्या बाबतींत कांहीं होत नाहीं, जणूं कांहीं तें एकादं करवंदाचं झुडुपच ओरबाडीत आहेत ! जर एकाद्या बाईनं, आपल्या लहान मुलाचे कपडे, जर्मन शिपायाच्या हवालीं केले नाहीं, तर तो तिच्यावर बंदूक रोखून, तिला धमकी देईल. ती, जर आपल्या मालमत्तेचं संरक्षण करायला धज-लीच,—तर तो तिचा खून करील. त्याला, आपण गुन्हा करीत आहोंत, असं वाटतच नाहीं. एकाद्या बाईचा खून करणं काय, किंवा रानांत शिरून फांद्या मोडणं काय, त्याच्या दृष्टीनं, दोन्हीं गोष्टी सारख्याच—त्याला याचा विचार करायला लागत नाही.

नाझींच्यावर, जेव्हां पिछेहाटीची पाळी येते, तेव्हां, ते असेल नसेल तें सर्व जाळून टाकतात. न लढणारी रशियन नागरिकांची वस्ती, व लाल फौज, दोन्हीं त्यांना सारखींच वाटतात. एकाद्या रशियन कुटुंबाच्या, घरादाराची विल्हे-वाट लावणं ही गोष्ट, ते एक लष्करी विजय मानतात. खुद्द जर्मनींत, तें अगदीं रांगेत चालतील, जळकी काडीसुद्धां जमिनीवर फेंकणार नाहींत, इतकंच काय पण सार्वजनिक चौकांतून, हिरवळीवरून चालायला ते धजणार नाहींत. पण आमच्या देशांतील, प्रांतचे प्रांत, त्यांनी पायदळीं तुडविले आहेत; शहरच्या शहरं उध्वस्त केलीं आहेत; संग्रहालयांचे, संडास बनविले आहेत; शाळांचे तबेले केले आहेत.

बरं, हे प्रकार, पोमेरेनियाच्या गांवढळांनीं, किंवा टायरोलच्या मेंढपाळांनीं केले नाहींत, तर, असिस्टंट प्रोफेसर्स, लेखक, तत्वज्ञानाचे डॉक्टर्स, व हिटलरनं पोसलेले इतर "चतुर विद्वान" यांनीं केले आहेत.

आमच्या लाल सैनिकांनीं,—कालच्या सामुदायिक शेतकऱ्यांनी, मॉस्को व तुला या भागांत, फक्त चिमण्या ( धुरांडी ) शिल्लक असलेलीं, सबंध गांवच्या गांव पाहिलीं, तेव्हां त्यांना वोल्गा व सायबिरिया एथील, आपल्या खेड्यांची आठवण झाली. त्यांनीं, जेव्हां बायकामुलांना, थंडीच्या कडाक्यांत, उघडेनागडे अंगावर चिंधी नाहीं, अशा स्थितींत, कुडकुडतांना पाहिलं, तेव्हां–त्यांच्या मनांत नाझींबद्दल ज्वलज्जहाल द्वेष निर्माण झाला.

नागरिकांना, कसलीही दयामाया दाखवूं नका, अशा अर्थाचा हुकूम देतांना, एका जर्मन जनरलनं सांगितलं—" त्यांच्यांत भीति, थरकांप उत्पन्न करा ! " किती मठ्ठ वेडेपीर आहेत हे ! या बेट्यांना, रशियन स्वभावाची अजून चुणूक समजली नाहीं. त्यांनीं आमच्यांत भीति तर नाहींच, पण असं कांहीं प्रचंड तुफान, उत्पन्न केलं आहे, किं त्यांत तेच कुठल्या कुठं उडून जातील. सोवियत भूमिवर, जर्मनांनीं पहिला सूळ उभारला मात्र, त्याबरोबर अनेक गोष्टी स्वच्छ दिसूं लागल्या.

चालू युद्ध, हें मागच्या युद्धांसारखं नव्हे ही गोष्ट, आतां आमच्या देशां तील प्रत्येकाला समजली आहे. आज, पहिल्यानंच आम्हांला हें कळलं आहे कि, आमच्याशीं लढणारीं, माणसं नाहींत, तर दुष्ट नरपशू, रानटी, पण आधुनिक शस्त्रसामुग्रीनं सुसज्ज, असे राक्षस आहेत. ते, नियम, कायद्याबरहुकूम, शास्त्रांचा योग्य उपयोग करून, क्रूर कतली करतात, आणि त्यांच्या मतं, अंगाखांद्यांवर खेळणाऱ्या अर्भकांची निर्दय कत्तल, म्हणजे राजनीतीचा कळस होय.

आम्ही कांहीं आपोआप, द्वेष करायला लागलों नाहीं. सबंध शहरंच्या शहरं–प्रांतच्या प्रांत, लाखों माणसं–एवढी जबर किंमत आम्हांला भरायला लागली. पण, आज आमच्यांत जो द्वेष शिरला आहे, तो ताज्या मद्याप्रमाणं तात्पुरता चढणारा नाहीं, तर तो आमच्या नसानसांत पुरा भिनला आहे; तो आतां कणखर बनला असून, त्याला निश्चयाचं तीक्ष्ण टोंक, प्राप्त झालं आहे. या जगांत, आम्हीं आणि फॅसिस्ट, कल्पांती एकत्र राहणार नाहीं–दोघांना हें जग पुरणारचा नाहीं–हें, आज आमच्या प्रत्ययास आलं आहे. फॅसिस्टांशीं

तडजोड, किंवा सौदेबाजी बिलकुल अशक्य आहे. आमचा जगण्याचा हक्क, हें एकच साधसुधं ध्येय, आमच्या डोळ्यासमोर तळपत आहे.

आम्हीं द्वेष करायला शिकलों खरं, पण त्याबरोबरच, आमच्यांतले गुण गमावले नाहींत. आम्हीं, ज्या अग्निदिव्यांतून गेलों, त्यामुळं आमची अंतःकरणं, अधिक संवेदनाक्षम झालीं आहेत, हें इथं सांगायलाच कां पाहिजे ? मोठमोठ्या कुटुंबांतील असंख्य माता, आजच्या आणीबाणीच्या प्रसंगीं, पोरक्या मुलाबाळांना, भराभर दत्तक घेत आहेत, हें पाहून अंतःकरण भरून येतं व डोळयांत पाणीं उभं राहतं !

मला, ल्यूबा सोसुंकेविच, या तरुणीची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं. शत्रूकडून गोळीबाराचा नुसता पाऊस पाडला जात होता अशा प्रसंगीं, न डगमगतां, तिनं, जखमी शिपायांना प्रथमोपचार केला. खंदकाला, जर्मनांचा चोहोंबाजूनीं वेढा पडला होता, पण, एका हातांत रिव्हॉल्व्हर घेऊन, या एकट्या वीरबालेनं, डझन जर्मनांशी सामना दिला, आपल्या ताब्यांतील जखमी शिपायांचं संरक्षण करून, त्यांचा अमानुष हालांपासून बचाव केला.

किंवा वाऱ्या स्मिर्नोवा, या साध्या रशियन मुलीची कामगिरी पहा. बंदुकांच्या फैरी झडोत, वा ट्रेंच मॉर्टर तोफांची भरबत्ती चालू असो, त्यांतून, बेधडक मार्ग काढून, वाऱ्या—अगदीं आघाडीवरील सैनिकांना पत्र पोंचविते. बरं, ती पत्रांना इतकी जपते, किं जणूं कांहीं तो बहुमोल ठेवाच ? ती मला म्हणाली " हे अगदीं स्वाभाविक आहे… …प्रत्येक जण पत्राची, दोन्ही डोळ्यानीं वाट पहात असतो… …जर घरची पत्रं मिळाली नाहीं, तर जीवन किती निराशामय होईल… …"

पण रशियनांना केवळ आपल्या लोकांबद्दल विशेष काळजी वाटते असं नाहीं. दुसऱ्यांनासुद्धां यातना झालेल्या पाहून त्यांच्या आंतड्यांना पीळ पडतो. लेनिनग्रादच्या रणकंदनांत सांपडलेल्या स्त्रियांनीं, लंडनच्या स्त्रियांना जो संदेश पाठविला, त्यांत किती खोल सहानुभूतिच्या भावना सामावलेल्या आहेत ! उध्वस्त केलेल्या पॅरिसमधील नागरिकांबद्दल, लाल सैनिकांनी मला प्रश्न विचारून विचारून

नुकोसं केलं आहे. नाझींनी ग्रीक लोकांना, उपासमारीनें कसं ठार मारलं, याचं वर्तमानपत्रांत आलेलं वर्णन, एकजण वाचून दाखवीत होता. कित्येक लाल सैनिक ते कान देऊन ऐकत होते. त्यांच्यातच, सारानोव भागांतील एक सामुदायिक शेतकरी होता. तो एकदम उसळून म्हणाला, "खरोखर ही मोठी आपत्तिच कोसळलीय्......जगांत पहावं तिथं हें चालू आहे...जनतेला मदत करण्यासाठीं या फॅसिस्टांना शक्य तितक्या लवकर चिरडून टाकलंच पाहिजे."

आम्हांला हिटलर नाझींबद्दल जो द्वेष वाटतो—त्याच्या मुळाशीं... आमचं स्वदेशप्रेम, माणसाबद्दल वाटणारं प्रेम—मानवजातीबद्दल वाटणारं प्रेम आहे, आणि यांतच, आमच्या द्वेषाचं सामर्थ्य नि समर्थन आहे. अंध-द्वेषानं, जर्मनीचा आत्मा कसा नष्ट झाला आहे—हें आम्हांला, हिटलरगुंडाची प्रत्यक्ष गांठ पडल्यावर समजतं. नाझींचा हा अंधद्वेष, व आमचा माणुसकीनं स्फुरलेला द्वेष, यांत जमीनअस्मानाचं अंतर आहे. आम्ही झाडून साऱ्या नाझी-गुंडाचा द्वेष करतों; कारण प्रत्येक नाझी मानवद्वेषी तत्वाचा प्रतिनिधी आहेः जाणूनबुजून झालेला खुनी आहेः दरोडेखोरीचं तत्व पाळणारा आहेः आमच्या व इतर देशांत, त्यांनी व्यक्तिशः व सामुदायिकपणं, जे जे अनन्वित अत्याचार केले...त्याबद्दल आम्ही प्रत्येक नाझीवर द्वेषानं जळत असतों. विधवांचे अश्रू, मुलांबाळांचं उध्वस्त जीवन, निराश्रितांचे तांडेच्या तांडे, धुळीस मिळविलेलीं असंख्य शेतें, लाखों जीवांची हानि, दीर्घ परिश्रमांच्या फळांचा, केलेला सत्यानाश...या सर्वांत आमच्या द्वेषाचं बीज सांठविलेलं आहे.

आम्ही माणसांशीं लढत नाहीं–तर, माणुसकीचा अंशदेखील नसलेल्या, पण माणसासारखे नाकडोळे असलेल्या, कळसूत्री बाहुल्यांशीं लढत आहोंत. आम्हांला त्यांचा अतोनात संताप येतो, कारण, ते माणसांसारखे दिसतात, हंसू शकतात, कुत्र्याला किंवा घोड्याला थोपटतात; डायऱ्यांतून आत्मनिरीक्षण करितात...त्यांनी माणसांचा...सुसंस्कृत युरोपियनांचा वेष धारण केला आहे... या गोष्टींची आम्हांला चीड येऊन आमचा द्वेष अनावर होतो...

पुष्कळ वेळां, आपण शब्दांचा मूळ अर्थ बदलून, ते वापरतों. जेव्हां आम्हीं सूडाची प्रतिज्ञा करतों, तेव्हां द्वेष हा शब्द, आम्हीं क्षुद्रार्थानें

वापरीत नाही. नाझीनीं जे अमानुष अत्त्याचार केले तसेच आमच्या मुलां-मुलींनी करावे, म्हणून कांहीं आम्हीं त्याचं संगोपन केलं नाहीं. आमचे लाल सैनिक कल्पांतींही, जर्मन मुलांची कत्तल करणार नाहींत, वायमारमधील गटेच्या घराला, आग लावणार नाहींत, किं मार्बुर्गच्या ग्रंथालयांची राखरांगोळी करणार नाहींत ! सूड–म्हणजे जशास तसं……शत्रूला त्याच्याच भाषेंत उत्तर देणं. पण आमची नि फॅसिस्टांची भाषा एक नाहीं.

आम्ही, सूडाची नव्हे तर न्यायाची अपेक्षा करीत आहोंत. दुनियेंत माणुसकीच्या तत्वांचा पुनः एकवार परिपोष व्हावा, म्हणून आम्हीं फॅसिस्टांना गाडण्याच्या तयारीला लागलों आहोंत. बहुरंगी, व विविधतेनं नटलेलं, गुंता-गुन्तीचं जीवन पाहून, आम्हांला निरतिशयानंद होतो. निरनिराळीं राष्ट्रं, तेथील जनता, यांचे स्वभावविशेष पाहून, आम्हांला आनंदाचं भरतं येतं. आपल्या या जगांत, प्रत्येकाला पुरेशी जागा आहे. हिटलर कारकिर्दीतील अघोर अत्याचाराचं प्रायश्चित घेतल्यानंतर, जर्मन लोकसुद्धां जगतील. पण दीर्घ रेखांशांनासुद्धां मर्यादा असतेच. हिटलरला घालविल्यानंतर, जर्मनीचे भावी सुखी जीवन कसं काय होईल, याविषयीं कांहीं विचार करणं, किंवा बोलणं, येथं अस्थानीं ठरेल. जोपर्यंत लाखों नाझी आमच्या देशांत मनसोक्त धूमाकूळ घालीत आहेत, तींवर भावी जर्मनीचीं सुखचित्रं चितारणं, अप्रामाणिकपणाचं होईल.

लोखंड कडाक्याच्या थंडीत उघडं राहिलं तर, जाळल्याप्रमाणं, खाक होतं. द्वेषाचा प्रतिसिद्धांत म्हणजे जीवन देणारं प्रेम.

"जर्मन फॅसिस्टांचा नायनाट करा"—ही घोषणा–'जीवनाशीं निष्ठा दर्शविणाऱ्या शपथेप्रमाणं वाटते. नाझींना खडे चारणारे लाल–सैनिक, स्वतःची कातडी बचावीत नाहींत. अथांग सरलभावना, त्यांच्या मनोवृत्ति थरारून टाक-नात व त्यांना स्फूर्ति देतात. निर्दय शत्रूचा नाश करण्याच्या भावना, कुठं अन्त पावतात व स्वदेशप्रेमाच्या भावना कुठं उगम पावतात, हें कुणी सांगावं ? प्रत्येक नाझीच्या मृत्युनंतर, लाखों लोक सुटकेचा निश्वास टाकतात. प्रत्येक नाझीला मारणं, म्हणजे वोल्गा भागांतीलं मुलाचं जीवन सुखी जाईल, पॅरिसच्या नाग–

रिकांना पूर्ववत् स्वातंत्र्य मिळेल–अशा अर्थाची शपथच होय. प्रत्येक नाझीचा मृत्यु, हें जगाला वांचविणारं अमृत होय.

एका, सुंदर तरुणीला, बंधमुक्त करण्यासाठीं, सेंट जॉर्जनं, राक्षसाला कसं मारलं, हे एका ख्रिश्चन दंथकथेंत सांगितलं आहे. हवालदील झालेल्या मानव-जातीला स्वतंत्र करण्यासाठीं, आज लाल फौज नाझींना कंठस्नान घालीत आहेत. हा संग्राम उग्र तर खराच, हें कार्य कांहीं साधं नाहीं.........पण यापेक्षां उदात्त असं दुसरं कोणतंच कार्य नाहीं!



# एकमेकांची ओळख ! : : ७

जर्मनांनी एक लहानशी पुस्तिका प्रसिद्ध केली आहे. "रशियन भाषा जरी येत नसली, तरी, एकमेकांची ओळख करून देणारा वाटाड्या." हें त्या पुस्तिकेचं नांव.

या पुस्तिकेच्या प्रत्येक पानावर, चित्रं काढलीं असून, त्याला जर्मन व रशियन, दोन्हीं भाषांत मथळे दिले आहेत. इतकंच नव्हे, तर "परस्परांची ओळख व्हावी," म्हणून रशियन उच्चारसुद्धां, छापले आहेत. रशियांत पाऊल टाकलेल्या प्रत्येक जर्मन शिपायाला, ही पुस्तिका अत्यंत महत्वाची वाटेल, यांत संशय नाहीं.

समजा, एकाद्या जर्मन शिपायाला भूक लागली आहे, तर तो काय करील? खिशांतून पुस्तिका काढून, त्यांतून आपल्याला काय हवंय, ते शोधून काढील व हुकूम फर्मावील, "कोबीचीं सॉमेज आण." (कारण, हें जर्मनांचं आवडतं खाद्य आहे.)

ज्यानं, ही "एकमेकांची ओळख" करून देणारी पुस्तिका लिहिली असेल. तो एकादा शेख महंमदच असला पाहिजे, कारण अथपासून इतिपर्यंत यांत खाण्याशिवाय दुसरा विषयच नाहीं. "कांही तरी खाण्याचे विचार," यावर पानंच्या पानं भरून काढलीं आहेत. प्रत्येक पानाचा मथळाच पहाना:– "नास्ता," "खाना." "स्वयंपाक घरांत", "खाटकाच्या दुकानांत", "भटाऱ्याच्या दुकानांत, इत्यादि". एकमेकांची जर ओळखच करून घ्यायची म्हणाल, तर जर्मन भाषा न येतां देखील, एक गोष्ट स्पष्ट दिसते, किं हे लेखक महाशय, पक्के भोजनभाऊ असले पाहिजेत.

खाण्याच्या गोष्टी, मोठ्या चलाखीनं मांडण्यांत आल्या आहेत. उदाहरणार्थ. "नास्ता आण लवकर", "दोन तीन उकडलेलीं अंडी आण" "पांच अंडी आण".

पाहिलंत ? प्रथम विनयशीलपणानं, तीनच अंडी मागत होते. पण पूर्ण विचारांती, त्यांनी ठरवलं, "कांहीं हरकत नाहीं, पांच अंडी दडपूं या !"

सर्वसाधारणपणं, प्रत्येक पानावर चवी परी आढळतील; तसे मोठे चोखंदळ आहेत बरं हे ! "चहा किंवा कॉफी आण," असं एकादं वाक्य तुम्हांला या पुस्तिकेंत आढळेल तर शपथ ! अशा गोष्टी जर्मन इभ्रतीला बट्टा लावतील ना ! त्याऐवजीं काय वाक्यं आहेत पहा: "मलई टाकून कॉफी आण," "लिंबू टाकून स्ट्रॉंग चहा आण." आतां, केकसंबंधी म्हणाल, तर एकाचाच उल्लेख आहे. "क्रीमपफ आण."

ही पुस्तिका वाचली कीं यांच्या मिजासखोरीपुढं थक्क व्हायला होतं. यांच्या मागण्या पाहिल्या, किं एखादा स्तिमितच होईल.

बरं, मांसाच्या पदार्थांच्या बाबतींत देखील, हे कांहीं अडाणी नाहींत बरं. त्यांना गरम सॉसेजेस्, चमचमीत गाईचं मांस, इतकंच काय, पण वेस्टफाल-हॅमसुद्धां लागतं.

आइसक्रीमच्या वेळेला मात्र, हे जरा गारठतात. काय असेल तें असो, पण आइसक्रीम कसं मागावं, यासंबंधी ही पुस्तिका काय म्हणते, तर "मला थोडं

आइसक्रीम द्या." पडसं होईल म्हणून धास्ती पडली असावी बेट्यांना ! नाहींतर, या बुभुक्षितांनी, "थोडं," आइसक्रीम कशाला मागितलं असतं ?

खाण्या व्यतिरिक्त इतर विषयांना, या पुस्तिकेंत, फाजील महत्व देण्यांत आलं नाहीं. तरी देखील "हें कपाट उघड," "बोल, गोडीगुलाबीनं तुझी सर्व चीजवस्त दाखव," असे कांहीं बाणेदार नि तेजस्वी प्रश्न, मधून मधून सांपडतात. एवढंच आहे त्या पुस्तिकेंत ! नि तेंसुद्धां लॅटिन लिपींत !! हें सगळं कशासाठीं ? तर, "एकमेकांची ओळख" व्हावी म्हणून !!! "मुकाट्यानं, तुझी सर्व चीजवस्त टाक", असं वाक्य तुम्हांला सांपडायचं नाहीं, हें उघड आहे. एकूण "एकमेकांची ओळख" व्हावी, या उद्देशानं लिहिलेली, ही पुस्तिका जरी वाचली, तरी या "श्रेष्ठवंशीय" लोकांच्या, इच्छा वा आकांक्षा, नीटशा समजत नाहींत.

या पुस्तिकेची गंमत अशी कि, "शरणागती", "पार्टिझान्स", "पश्चिम दिशेस पलायन" या विषयीं, अवाक्षरही नाहीं. "मी मुकाट्यानं शरण आलोंय्"; "कुठं बरं मी शरण जाऊं ?" "दया करा !" अशी कांहीं वाक्यं जर या पुस्तिकेंत असती ना, तर तिच्या मौलिकेंतेंत भर पडली असती. पण, बहुतकरून प्रकाशकांच्या मनांतून, जर्मन सैनिकांचं तेजोहरण करायचं नव्हतं.

बरं जाऊं द्या ! लालफौजेनें हें कार्य हातीं घेतलंय्, नि खुनी, डाकू हिटलरी गुंडांना, ती अविश्रांतपणं, पश्चिमेस रेटीत आहे.



## झुंज : : : : : : ८

जर्मन वैमानिकाला, आपलं भक्ष्य स्पष्ट दिसत होतं; आकाशांतून हिरव्यागार वर्तुळाप्रमाणं दिसणाऱ्या, रानांतून–अरुंदसा पिवळा पट्टा ओढलेला दिसत होता. ती रेल्वेची संरक्षण तटबंदी असून, त्याच्या बाजूबाजूनं, लष्करी मालगाडी हळू हळू रांगत चालली होती. ती रानांतून चालली असतांना, तिच्यावर झडप घालण्यांत कांहीं अर्थ नव्हता. त्या जर्मन वैमानिकानं असा पोक्त विचार केला कि, आतां या वेळीं एकदम गाडीवर बॉंब हल्ला चढविणं शहाणपणाचं नाहीं. त्यापेक्षा या रानांतून गाडीला जरा बाहेर पडूं दे व पुढच्या रानांत शिरायच्या आधीं, मोकळ्या जागेंत गाडी आली, कि सावकाश, अचूक बॉंबफेंक करावी.

विमान वळल्या बरोबर, उन्हांत त्याचे पंख चकाकले. विमानानं आणखी एक वळण घेतलं, पुनः एकदा आकाशांत वर चढलं, व झर्रकन्, त्या मोकळ्या जागेजवळ, अतिशय वेगानं खालीं आलं. गाडी ज्या ठिकाणीं येणार त्या ठिकाणच्या तटबंदीच्या दोन्ही बाजूला, चिखलाचे व मातीचे ढीगच्याढीग, हवेंत उडाले. पण त्या वैमानिकानं मान वळवून खालीं पाहिलं, तों त्या मोकळ्या

जागेपाशीं गाडी येतांच, ही रेंसभरही पुढं न सरकतां, पुनः मागं रानांत गडप झाली. त्यानं फेंकलेलें बाँब मात्र फुकट गेले.

जर्मन वैमानिकानं पुनः विमान फिरविलं. यावेळीं आपला फटका चुकतां कामा नये, असं त्यानं मनाशीं ठरवलं. गाडी त्या मोकळ्या जागेंतून, भराभर रस्ता कापीत चालली होती. आपल्या पुढं काय भयाण संकटाचं ताट वाढून ठेवलं आहे, हें त्या बिचाऱ्या ड्रायव्हरला काय माहित ? समोरच्या रानांत गाडी शिरायचा आवकाश किं, बाँब स्फोटानं समूळ उपटून, आकाशांत उंच उडवलेली, भरभक्कम पाईन–झाडं, गाडीच्या डब्यांवर येऊन आदळणार होतीं. झाडं धाड-कन् पडलीं खरीं, पण गाडीला मात्र काडीची इजा झाली नाहीं. गाडी तो प्रसंग हुकवून, पुढं चालली होती. ड्रायव्हरनं अशा तऱ्हेनं तुरी दिल्यानं, पुनः जर्मन बाँब्स फुकट गेले.

वैमानिकानं शिव्यांची लाखोली वाहिली. ही इतकी लांबलचक रडतखडत जाणारी लष्करी मालगाडी, अशी सहजासहजीं सहीसलामत सुटून जाणार किं काय ? मी, जर्मन अजातशत्रू सेनेचा प्रख्यात वैमानिक, माझ्याशीं हा निशस्त्र रेल्वे–ड्रायव्हर स्पर्धा करूं पहातो काय ? तें कांहीं नाहीं, या वेड्यापीराला, एकदां धडा शिकविलाच पाहिजे. गाडीच्या बरोबर मध्य भागावर नेम धरून, पुनः त्या जर्मन बाँबफेंक्या विमानानं, झडप घातली.

आतां कदाचित, त्या वैमानिकाचा नेम चुकला म्हणून म्हणा, किंवा नशीब म्हणा, पुनः बाँब भलतीकडे पडले. पुनः अभिमानानं धूर सोडीत, गाडी पुढं चालली होती.

"आतां मात्र डोकं ताळ्यावर ठेव हं. आतां चेष्टा नाहीं या खेपेला हें काम साधलंच पाहिजे." वैमानिक स्वतःलाच उद्देशून म्हणाला. त्यानं खालील जमिनीची, किती तरी वेळ विचारपूर्वक पहाणी केली. हा आट्यापाट्यांचा खेळ त्याला आतां मजेदार वाटायला लागला.

गाडीच्या धुराची, उंच हवेंत दरवळणारी निळसर, फीत हाच नेम धरून, पुनः त्यानं झडप घातली. त्याला वाटलं किं, आपण सरळ इंजिनवर तर झेंप

टाकीत नाहींना ! पण शेवटीं पहातो, तों शेवटच्या क्षणाला कुणीतरी, त्या गाडीला, विमानाखालून बाजूला ओढलं. बॉम्बस्फोटाचा आवाज त्याच्या कानांत दुमदुमत असतानांच, त्याच्या लक्षांत आलं किं ही वेळ पण फुकट गेली. त्यानं खालीं वांकून पाहिलं, तों खरंच ! गाडी होती तशी शाबूत असून, मर्जी-प्रमाणं पुढं सळसळत चालली होती.

आतां त्या वैमानिकाला कळून चुकलं, किं आपला शत्रूसुद्धां आपल्या इतकाच चलाख, तीक्ष्ण दृष्टीचा व कावेबाज आहे. अशा प्रतिस्पर्ध्याशीं दोन हात करणं—त्याला नेस्तनाबूत करणं, म्हणजे कांही मस्करी नाहीं.

कितीतरी वेळ ही धरपकड चालू होती. बॉम्ब, गाडीच्या पुढं पडत, पण त्या सर्वांना झुकांडी देऊन गाडी शान्तपणं स्टेशनकडे चालली होती, जणूं कांहीं अदृश्य दूतच तिला सांभाळून नेत होते.

मध्येंच गाडी वेगानं धावूं लागे, तर एकदम तिचा वेग मंदावे. उतरणी-वरून खालीं येतांना, ती तुफानी घोड्याला लगाम घातल्याप्रमाणं धांवे, तर पुढं बॉम्ब पडणार, हें कळूनच किं काय, खाडकन् ब्रेक लावल्यानं जागच्या जागीं, खडी उभी राही. कधीं कधीं ती एकदम मागं येई, तर कधीं थांबे, तर कधीं तीरा-सारखी भरधांव जाई. तो ड्रायव्हर या गाडीरूपी राक्षसाकडून, हवीं त्याप्रकारची कसरतीची कामं करून घेत होता, व तीसुद्धां इमानानं, धन्याच्या सर्व आज्ञा पाळीत होती. नाताळांतील फटाक्याप्रमाणं बॉम्ब फुटत होते.

जर्मन वैमानिकाला संतापानं, दरदरून घाम सुटला होता. शेवटीं चिडून तो थुंकला देखील ! पुन्हां पुन्हां तो त्वेषानं हल्ले चढवीत होता. "आतां हा शेवटचा हल्ला ! यावेळचा माझा अन्दाज बिलकुल चुकायचा नाहीं. काय बिशाद आहे यावेळीं गाडी सुटून जाईल ?" पण पहातो तों काय ? "अरेच्या बॉम्बच आहेत कुठं ? त्यानं बॉंब तर केव्हांच संपविले होते ? आतां गाडीवर हल्ला कशानं करायचा ?

पण तो बराच खालीं आला, व त्यानं मशिनगननं गाडीवर हल्ला चढविला. पण गाडीचं नशीब इतकं थोर, किं समोर पुन्हां एक रान दिसायला लागलं;

गाडी रानांत शिरल्याबरोबर, अजिंक्य बनली; वैमानिक त्वेषानं वेडा झाला. आपल्याला चकवून, शेतरानांतून गाडी नेणाऱ्या त्या इंजिन ड्रायव्हरवर, या निष्णात जर्मन वैमानिकानं नेम धरला. "मी प्रसिद्ध जर्मन वैमानिक, मला हुलकावण्या देणारा, हा कोण फडतूस रशियन कामगार ?"

असा विचार करून, त्यानं गाडीवर, गोळ्यांचा वर्षाव सुरू केला. त्यांतल्या कांहीं चाकांखालीं पडल्या, कांहीं रुळांवर आपटल्या, पण गाडी मात्र धीमेपणानं आपला मार्ग आक्रमीत, पुढं चालली होती..........

सरते शेवटीं, तो वैमानिक थकून गेला. वर आकाश चमचमत होतं. पावसाळी दिवस असल्यानं, आकाश निरभ्र व प्रशांत दिसत होतं, तें पाहिल्यावर त्याला, दूर असलेल्या, आपल्या वेस्टफालियाची आठवण आली.

त्याच्याजवळील काडतुसांचा सांठा संपला होता. ही झटापट पण संपली असून, जमिनीवरील रशियन कामगारानं, तो सामना जिंकला होता.

"काय बरं करावं आतां ? सबंध विमानासकटच गाडीवर झेंप घालावी ? तें कांहीं नाहीं, वेड्याशीं वेडंच बनलं पाहिजे !" वैमानिकाचं सर्वांग शहारलं. त्यानं विमान बऱ्याच खालीं आणलं. तो द्वेषानं व जिज्ञासेनं गाडीचं अवलोकन करीत होता. इंजिन ड्रायव्हरची तीक्ष्ण नजर आपल्यावर रोंखलेली आहे, हे त्याच्या ध्यानींही नव्हतं. ड्रायव्हर एवढंच म्हणाला.

"डामरटा, शेवटीं तुला चकविलंच किं नाहीं ?"

आणि ती गाडी, रुळावर पडलेली, शत्रुच्या विमानाची काळी सांवली. तिरस्कारानं ओलांडून, पुढं चालूं लागली.



# सतराजण : : : : : १

( ओदेसाहून आलेल्या सोवियत नागरिकांनीं, सतरा बालवीरांचं जीवन व मरण, याविषयीं सांगितलेल्या माहितीवरून. )

ओदेसांतील, कानात्लाया स्ट्रीट, हा समुद्र किनाऱ्याला समांतर आहे, पण समुद्र मात्र, घरांच्या रांगामागें दडून राहिल्यासारखा वाटतो. मधूनच एकदम जोराचा वारा सुटतो, व त्याबरोबर अरुंद बोळांतल्या भिंतीवरचं पोस्टर, फडफडून फाटतं, रस्त्यावरच्या पाट्या, हेलकावे खाऊन खडखडाट करितात, तर मधूनच एकादं झाड वांकतं. अशा प्रसंगीं मात्र, काळा समुद्र आपल्या किती जवळ आहे. याची जाणीव होते.

कानात्लाया आणि किरोव स्ट्रीटच्या नाक्यावर, एक दुमजली ईमारत आहे. फार मागं याच ठिकाणीं बिल्डिंग स्कूल होतं, पण सध्यां, इथले कांहीं विद्यार्थी लाल–फौजेबरोबर गेले आहेत; कांहींना हालहाल करून, शेवटीं गोळ्या घालण्यांत आल्या. ओदेसांतील इतर हजारों घरांप्रमाणं, हे घरसुद्धां उजाड दिसत होतं; त्यांतील सर्व चीजवस्त लूटमार करून नेलेली, व खिडक्यांच्या तावदानांचा

चक्काचूर झालेला, असं त्या घरांचं ओसाड रूप दिसत होतं. कांहीं महिन्यांपूर्वीं, नाझींनी इथं एक धंदेशिक्षण देणारी शाळा उघडली असून, इथून शिकवून विद्यार्थ्यांना पुढं जर्मनींत पाठविण्यांत येणार होतं. ओदेसा, निकोलायेव व आसपासच्या खेड्यांतील, पोरक्या, घरादाराला पारख्या झालेल्या तरुणांना, या शाळेत जुलूम-जबरदस्तीनं कोंबण्यांत येत असे. इथं हीं तरुण मुलं दिवसांतले, चौदा तास सतत राबत असत. इतकंच नव्हे तर तें झोंपायला गेल्यानंतर देखील, त्यांच्यावर करडा पहारा ठेवलेला असून, त्यांना एकमेकांशी बोलण्याची मुद्दां, बंदी करण्यांत आली होती.

एके दिवशीं नेहमीचा सर्व शिरस्ता बदलला. शिक्षक आजारी असल्यानं, विद्यार्थ्यांना तासभर वर्गात रिकामं ठेवण्यांत आलं. बाहेर सर्वत्र लखलखीत उन पडलं होतं, इतक्यांत कुणीतरी खिडकी उघडली, त्यासरशीं वाऱ्याची किंचित गरमशी झुळुक, आंत आली: शिक्षक आले नसल्यानं, मुलांची मजा उडाली असून, ते बांकावर बसून, मनाला येईल तें मोकळेपणानं बोलत होते.

“आतां जर समुद्र किनाऱ्यावर मला जायला मिळालं, तर काय मजा होईल ! ” कुणीतरी सुस्कारा सोडून म्हणाला.

“मी तर एकदम पाण्यांत उडी मारीन ! ” दुसरा म्हणाला.

“काय ? फेब्रुआरींत ? ”

“मग त्यांत काय झालं ! माझा भाऊ नाहीं का, सबंध हिंवाळाभर पोहत असे ? ”

“आणि माझा भाऊ डोल्फिन पक्षी पकडायला जायचा.........”

अशा रितीनं वेळ चालला होता; प्रत्येकाच्या मनांत असं येत होतं, कि हें स्वातंत्र्य, आतां लवकरच संपणार व पुन्हां जेलप्रमाणं, सगळा कारभार सुरू होणार !

विद्यार्थ्यांचा वर्ग एका प्रशस्त, चौकोनी, काळोख्या खोलींत भरत असे. फळ्यासमोरच, एक दार असून, त्याला नेहमीं कुलुप लावलेलं असे. एकजण

सहज उठला, दाराजवळ गेला, व त्यांत जोरानं दार ढकललं. दार उघडलेलं पाहून सर्वांना मोठं आश्चर्य वाटलं. तो मुलगा दाराआड दिसेनासा झाला.

" यार या ! आंत या ! " आनंदाच्या व उत्साहाच्या सुरांत, जवळच्या खोलींत कुणीतरी म्हणालं.

सगळेजण एकदम खोलींत घुसले. व आंत जो प्रकार, त्यांच्या नजरेस पडला तो पाहून, त्याचं काळीज चर्र झालं. कांचेच्या कपाटाची तावदान फोडलीं असून, आंतली पुस्तकं, जमिनीवर अस्ताव्यस्त भिरकावलीं होतीं, व त्यांतच, स्तालिन आणि वोरोशिलोवचे फोटो, चुरगळून टाकले होते. सर्वजण क्षणमात्र स्तब्ध उभे राहून, शांत व स्मितवदनी पुढाऱ्यांच्या फोटोकडे पहात राहिले.

दोनचार मिनिटं लोटलीं असतील. निरनिराळ्या ठिकाणांहून, दंडुकेशाहीच्या जोरावर पकडून आणलेलीं, हीं बारा तेरा वर्षांची मुलं होती. एकमेकांची नांवंसुद्धां त्यांना माहीत नव्हतीं. तीं अगदीं जवळ जवळ उभीं असून, प्रत्येकजण, स्वतःशीं विचार करीत होता. प्रथम जो खोलींत शिरला, तो मुलगा पुढं आला, व कांहीं तरी बोलणार, तोंच दुःखावेगानं, त्याच्या तोंडून शब्द उमटेना. पण लगेच त्यानं आपलं दुःख गिळलं, त्याचा चेहरा कठोर व करारी दिसूं लागला. त्यानं खालीं वांकून, स्तालिनचा फोटो उचलला, तो सारखा केला, व एका काठीला, झेंड्यासारखा लावून, काठी उंच धरून, तो खोलीबाहेर पडला.

मुलं, त्याच्या भोंवतीं गोळा झालीं, व सगळेजण रस्त्यावर आले. ते फुटपाथवरून, सावकाश पावलं टाकीत चालले असून, त्यांची तोंडें गंभीर व अभिमानी दिसत होतीं. त्या सबंध ओसाड गांवभर, आपण जणूं कांहीं नेहमींच्या मे-दिनाच्या कवाईतीप्रमाणं, चाललों आहों, अशा थाटांत ती फिरलीं. जणूं कांहीं ओदेसांत जे भीषण प्रसंग घडले, तें एक घाणेरडं स्वप्न असून, ओदेसांत नेहमीचंच खरंखुरं, शांत सुखी, सोवियत जीवन चालू होतं !

लोक बोडकेच उंबरठ्यांत राहून, या लहान मुलांच्या गटाकडे, पहात होते. यांची शंभर वर्षे भरलीं आहेत, हे त्यांनां पुरं ठाऊक होतं, तरी त्यांचं सारं लक्ष, त्या मुलांवर खिळलं होतं.

शेवचेंको बागेपाशीं, त्यांची एका पोलिसाशीं गांठ पडली. तो चपापून मागं हटला. कांहीं तरी भयंकर घडलं असून, आपली कातडी बचावण्याची हीच वेळ आहे, असं त्याच्या मनानं घेतलं.

पण थोड्याच वेळांत, तो पोलिस आणखी दहा बारा पोलिसांना घेऊन. आला. ती लहानगीं मुलं, झेंडा घेऊन, मागं हटलीं; बोलून चालून, तीं निशस्त्र होतीं, व त्यांचा पोलिसला शरण जायचा इरादा नव्हता. ती तशींच वर्गांत शिरलीं, व एकमेकांला बिलगून राहिलीं. सगळ्यांचे डोळे समोरच्या दाराकडे लागले होते. त्यांनी हातांत दगड धरून ठेवले होते,: डायरेक्टर आंत शिरतांच, त्यांनी त्याच्यावर दगडफेक केली.

कदाचित्, मुलांना पळून जातां येणं शक्य होतं, पण त्यांनीं पळपुटे-पणाचा विचार मनांत आणला नाहीं. स्तालिनचा फोटो लावलेली काठी हातांत धरून, तीं धीटपणानं, तशीच उभीं राहिली.

जर्मन्स, रुमानियन्स, पोलिश या सर्वांनीं, त्या इमारतीला वेढा दिला. जणूं कांहीं आंत, शेकडों हत्यारबंद शिपायांची शिबन्दी होती ! सोवियत नाग-रिकांसमोर, चळचळ कांपणाऱ्या या शिपायांनीं, भीतभीत काळजीपूर्वक रितीनं, इमारतींत, प्रवेश केला. सरतेशेवटीं, नखशिखान्त हत्यारबंद शिपाई, हातांत ऑटोमॅटिक रायफली घेऊन, वर्गांत शिरले व त्यांनी या निशस्त्र पोरांना, पकडलं.

कांहीं तासानंतर, सतरा बालवीरांना शहराबाहेर नेऊन, गोळ्या घालण्यांत आल्या. ते मृत्युमुखीं पडले खरं, पण कानात्लायास्ट्रीटवरील भयंकर प्रकाराची बातमी शहर व सबंध युक्राइनभर, वणव्याप्रमाणं पसरली.........

एका तासाच्या स्वातंत्र्यासाठीं, ज्या सतरा बालवीरांनीं मरण पत्करलं, त्यांची कथा, सर्व व्याप्त प्रदेशभर घुमली. जणूं कांहीं, "उठा ! जागे व्हा ! शत्रूचा प्रतिकार करा ! " असा तेजस्वी संदेश, ती जनतेला देत होतीं

ही सतरामुलं मेलीं खरीं, पण त्याच रात्रीं, ओदेसांत शत्रूचे, शस्त्रास्त्रांचे सांठे व कारखाने, उडवून दिले गेले: शिपायांनीं भरून येणाऱ्या, लष्करी रेल्वे गाड्या पाडण्यांत आल्या. आगी लावण्यांत आलेल्या, इमारतीच्या धडाडणाऱ्या प्रचंड स्फोटांत, व वर उसळणाऱ्या ज्वालांत, त्या सतरा बालवीरांच्या सुन्दर जीवनाचं, पुनरुज्जीवन झाल्यासारखं वाटत होतं.

हे दिवस जाऊन, आम्हीं पुनः ओदेसाला परत जाऊं, आणि मग, उक्राइनच काय, पण तमाम दुनिया, ज्या सतरा बालवीरांना कधींही विसरणार नाहीं, त्यांचीं नांवं, आम्हांला कळतील !



## लहान मुलं : : : : १०

कुणाविषयीं लिहूं बरं मी ? इतिहासाच्या पानावर शौर्याचीं कृत्यें, दररोज लिहिलीं जात आहेत. दिसायला साधीसुधीं माणसं हां हां म्हणतां, किर्ति शिखरावर जाऊन पोंचत आहेत. काल लहान म्हटला जाणारा मुलगा, आज अखंड किर्तीस पात्र झाला आहे. तर एकादी सामान्य शेतकाम करणारी म्हातारी... तिच्या धाडसाच्या दंतकथा, सर्वत्र पसरूं लागल्या आहेत. आज आमच्या देशांत अशी टीचभर जागा आढळायची नाहीं, किं जिथं मानवी प्रयत्नांची पराकाष्ठा दिसायची नाहीं, हृदयाचा मोठेपणा दृग्गोचर होणार नाहीं. असा एक दिवस सुना जात नाहीं, किं ज्या दिवशीं वर्तमानपत्रांत अतुल शौर्याचीं वर्णनं आलीं नाहींत, किं रेडिओवरून ती ऐकायला मिळालीं नाहींत. पण तितक्याच मोलाचीं अशीं अनेक कृत्यं रोज आढळत आहेत किं जीं, आकाशांत उंच जाणाऱ्या बहुरंगी रॉकेटप्रमाणं, नेत्रदीपक नसलीं, तरी तितक्याच शौर्यानं, स्वार्थत्यागानं, देशाभिमानानं, ओथंबलेलीं आहेत. तीं करीत असतां त्यांनीं प्राणाची पर्वा केली नाहीं.

या वीरकथांचा ईतिहास लिहिला जाईल, तेव्हां त्यांतील एक भाग, स्वतंत्रपणं, लहान मुलांच्या धाडसाच्या, व शौर्याच्या कथांसाठीं, राखून ठेवावा लागेल.

या बारा वर्षांच्या, मुलाच्या नांवाशीं काय करायचं आहे ? आज त्याच्यासारखीं कितीतरी लहान मुलं आहेत. पण याच मुलाची मी गोष्ट लिहीत आहे, याचं कारण एवढंच कि, तो प्रसंग, प्रत्यक्ष डोळ्यानं पाहिलेल्या एका इसमानं, मला सांगितला. कथा अगदीं साधी, पण आश्चर्यकारक आहे.

रस्त्यावरून येणाऱ्या जर्मन टँक्सचा खडखडाट ऐकूं येत होता; तें एक जुनं उक्रानियन खेडं असून, वीस वर्षांपूर्वीं जर्मनांशी दिलेल्या सामन्यांची आठवण, अजून तिथल्या लोकांच्या मनांत ताजी होती. क्षणार्धांत ते पोलादी राक्षस ( जर्मन टँक्स ) गांवच्या सीमेवर येऊन टाकले असते, पण गांवाजवळच इतकं दाट जंगल पसरलं आहे, कि त्याच्या आडून शत्रूला सळो का पळो, करून सोडतां येईल.

गांवातील पुरुषमाणसं घरदार सोडून, रानांत दबा धरून बसलीं. घोड्यावर टांग मारल्याबरोबर, धुळीच्या लोटांत तीं तावडतोब दिसेनाशीं झालीं, पण धुळींतून अंधुक दिसणाऱ्या घोड्यांच्या मागं, एक बारा वर्षांचा मुलगा धांवत आहे. गांवातील सर्वजण, त्याला मागं टाकून रानांत जात आहेत.

त्या मुलानं लहानशा थरथरणाऱ्या हातांनी घोड्याची आयाळ, व रिकिब धरली. पण, जिथं अनेक अडचणींचं ताट वाढून ठेवलं आहे, मृत्यु पाठीशीं उभा आहे, अशा रानांत त्या मुलाला न्यायला ते तयार नव्हते. बरोबर आहे, रानांतील हाल अपेष्टांना तोंड देणं, हें मोठ्या माणसांशिवाय कुणाला साधायचं नाहीं.

डोळ्यांतून अश्रुधारा वहात आहेत, व दीनवाण्या मुद्रेनं घोड्याची रिकिब धरून, घोड्यामागं धांवत आहे, अशा त्या मुलाला पाहून, त्यांना मनापासून फार वाईट वाटलं. त्याच्या लहानग्या कोमल हृदयाला जखम झाली आहे. "आपल्याला रानांत नेलं नाहीं, आपण हातांत शस्त्र धरण्याच्या लायक नाहीं," ही गोष्ट त्या मुलाच्या मनाला लागली. पण कां कुणाला ठाऊक, त्याचं मन त्याला सांगत होतं, " तूं मुद्दां यांच्याबरोबर रानांत जायला लायक आहेस."

त्या मुलाच्या मनांतून असं वाटे कि, आपणसुद्धां इतराप्रमाणं झालं पाहिजे. घोडे वेगानं पळूं लागले. तो काय त्यांचा पाठलाग करणार ? त्याच्या आवाजांत निराशा पसरली होती.

पण इतक्यांत घोड्यावरील एकजण थांबला, व खालीं वांकून, त्यानं त्या मुलाच्या हातांत लहानशी वस्तू दिली.

" हं, हा घे हातबॉम्ब ! गांवात नीट दबा धरून बस. तुला जर कांहीं विशेष आढळलं—तर ताबडतोब आम्हांला कळव, बघ, हां, डोळ्यांत तेल घालून बस—आणि जर तशी वेळ आलीच—तर मग त्यांना याचा इंगा दाखव."

मुलाच्या डोळ्यांतील अश्रू लगेच नाहींसे झाले. त्याच्या चिमुकल्या बोटांनी, थंडगार हातबॉंब घट्ट धरून ठेवला होता, "हं ठीक ! आतां बरं आहे. त्यांच्याप्रमाणंच, आपल्यापाशीं हातबॉंब आहे—आणि—मोठ्या माणसांप्रमाणं. आपल्यालासुद्धां, कामगिरी नेमून दिली आहे, नाहीं कां ? वाः ! फारच छान !"

त्यानं हातबॉंब ब्लाऊझच्या आंत खोंचला, व तो गांवाकडे वळला. बजावल्याप्रमाणं प्रत्येक लहानसहान गोष्ट, तो नीट न्याहाळीत होता. अजून जर्मनांनीं संधी साधून, गांवावर झडप घातली नाहीं. निव्वळ सावधगिरी बाळगायची, म्हणून एकदम गांवात न घुसतां, ते गांवाबाहेर तळ देऊन बसले आहेत.

मुलानं आजूबाजूला पाहिलं; रस्त्याच्याकडेला एका झोंपडींत लष्करी अधिकाऱ्यांची मुख्य कचेरी आहे; जर्मन अधिकाऱ्यांची, आसपास येजा चालू आहे; दारावर संत्री पहारा आहे. त्याचा हात, बॉम्बवर असल्यानं, लोखंडाचा थंड स्पर्श त्याच्या हाताला होत आहे, पण बॉंब जाग्यावर आहे कि नाहीं. म्हणून त्याचीं चिमुकलीं बोटं बॉम्बला, चांचपीत—कुरवाळीत आहेत. " ठीक आहे ! बॉम्ब कुठं हरवला नसून ब्लाउझच्या आंत आहे,—आणि जर्मन लष्करी अधिकाऱ्यांची मुख्य कचेरी समोरच्या झोंपडींत आहे."

त्याच्या मनांत विचार आला कि, " हे लांडगे आपल्या गांवात घुसणार, जाळपोळ, नासधूस करणार, बायकांमुलांची कत्तल करून लूटमार करणार." त्याच्या आधींच, आपण यांच्यावर एकदम अचानक छापा घालून, हल्ला चढवावा.

तो तडक निघाला. दारावरील संत्री शिपायाशीं, खणखणींत शब्दांत बोलतांना, त्याची बोबडी वळली नाहीं, किं डोळ्यांची पापणी लवली नाहीं. हातवारे करून, तो त्या शिपायाला समजावीत होता, " मला महत्वाची बातमी कळवायची आहे, जर्मन अधिकाऱ्यांना मला भेटलंच पाहिजे. "

इतक्यांत एक अधिकारी बाहेर आला. " तुला काय पाहिजे ? " असं त्यानं मोडक्या तोडक्या उक्रानियन भाषेंत, त्या मुलाला विचारलं; तो मुलगा चांचरला नाहीं. त्यानं अधिकाऱ्याच्या नजरेला नजर भिडविली. " मी अमूक अमूक ! रशियन लोक कुठं लपून बसले आहेत, तें मला ठाऊक आहे. तेंच सांगायला मी आलों आहे. "

त्याला झोंपडींत घेण्यांत आलं. टेबलाजवळ सहा अधिकारी बसले असून, टेबलावरील नकाशाकडे पाहून, ते आपसांत कसली तरी चर्चा करीत होते; त्यांनी नजर वर करून, मुलाकडे पाहिलं.

त्यांना उपयोगी पडेल, अशी कांही माहिती या मुलाजवळ आहे. अस्सं ! पण त्या मुलाच्या मनांत मात्र कांही तरी घोळत होतं. तो खोली न्याहाळीत होता. समोर सहा अधिकारी बसले आहेत. त्यांच्या दंडाला बहुमानाची फीत लावली आहे. निस्संशय ! हे कुणी तरी बडे अधिकारी असले पाहिजेत !

त्याच्या हाताला बॉम्बचा थंड स्पर्श झाला. त्याची नजर करारी, व जळजळीत दिसूं लागली. मनांतल्या मनांत, पुनः एकदां त्यानं अधिकारी मोजले, कामगिरी यशस्वी करायची, म्हणजे कुठं उभं राहिलं पाहिजे—त्याचे विचार चालले होते, तो हुशारीनं व शांतपणं, विचारलेल्या प्रश्नांची उत्तरं देत होता. "अमका अमका,—इतकेजण रानांत निसटले, बरोबर ! एकूणएक माणूस बरोबर !"

अधिकारी उतावीळपणानं, त्याला करड्या सुरांत प्रश्न विचारीत होते. तो सावकाश, यंत्राप्रमाणं उत्तरं देत होता. खेडवळ लोकांप्रमाणं, तो उगाच लांबलचक बाता झोंकून, वेळ काढीत होता. टेबलाजवळ बसलेल्या अधिकाऱ्यांना शंका येऊं नये, म्हणून तो बोलत बोलत, वेळ दवडीत होता. इतकी बारीकसारीक माहिती देत होता तो !

सरते शेवटीं टेबलाजवळ बसलेल्या, वरिष्ठ अधिकाऱ्यानं हात हालविला— "बस्स ! माणसं गेलीं, व कशीं गेलीं तें सर्व समजलं !—" आतां एकच प्रश्न उरला—"ते आहेत कुठं ?"

दुभाष्यानं भाषांतर करून प्रश्न विचारला,

" लोक कुठं आहेत ? "

मुलगा एक पाऊल पुढं आला. तो आतां अगदीं टेबलाजवळ उभा होता. त्या सहा अधिकाऱ्यांकडे आपली तिखट नजर रोखून, तो एखाद्या मोठ्या माणसा प्रमाणं कडाडला, " सगळीकडे आहेत ! "

झपाट्यानं, त्यानं हातबॉंब बाहेर काढला. व डोळ्याचं पातं लवतं न लवतं. तों टेबलाजवळच्या अधिकाऱ्यांवर फेंकला. ते उडी मारून उठणार व व ओरड-णार—त्याच्या आंतच, सर्व कारभार आटोपला होता !

—त्यांच्याबरोबर तो मुलगा पण बळी पडला. पण हरकत नाहीं. बारा वर्षांच्या एका मुलानं, सहा वरिष्ठ जर्मन अधिकाऱ्यांना, यमसदनास पाठविलं होतं. त्याच्या तोंडावर, मोठ्या माणसाप्रमाणं करारीपणा झळकत असून, धारातीर्थी पतन पावलेल्या वीराचं तेज, त्याच्या निस्तेज मुखावर झळकत होतं.

त्याचं शव थडग्यांत पुरलं जाणार नाहीं, मातृभूमी तें पोटांत ठेवणार नाहीं, तर त्याच्या तेजस्वी बाणेदार अंतःकरणाचं, तळपत्या तलवारींत रूपांतर होऊन, ती उपसलेली तलवार, उक्रानियन खेड्याखेड्यांतून, "सूड घ्या," अशी आरोळी फोडणारी, भडकती ज्वाला बनेल !

म्हणून, या मुलाच्या नांवाची कांहीं जरूर नाहीं. लहानपणीं शेतांत नाचत बागडत असतां, आईनं त्याला कोणत्या लाडक्या नांवानं हांक मारलं असेल, त्याच्याशीं काय करायचं आहे ? त्याच्यासारखी शेंकडों मुलं आहेत,—उतावळीं, शूर व मोठ्या माणसांप्रमाणं प्राणाची आहुती देणारीं,—अशी शेंकडों मुलं, आज सोवियत युनियनमध्यें आहेत.



# सफरचंदाचं झाड : : : ११

बॉम्ब आसऱ्यांतील सर्व दिवे मालविले गेले. लगेच लोकांची ओरड, व खुर्च्या आणि बांक सरकविल्याची घरघर, ऐकूं आली......जरा वेळानं कुणीतरी मोठ्यानं ओरडलं.

" कॉमरेड्स ! शांत रहा. आहां तिथं बसून रहा. कांहीं झालेलं नाहीं. ! "

याप्रमाणं ते दाट अंधारांतच बसून राहिले होते. हवाईहल्ला सुरू होऊन किती तरी तास लोटले होते. चित्रं काढतांना, बसण्यासाठीं म्हणून असलेल्या घडीच्या स्टुलावर, कलावन्त बसला होता. त्यानं स्वतःच हें छोटसं स्टुल बन-विलं होतं, व आतां तर त्याचा कितीतरी उपयोग होत होता. कलावन्त, लहानशा जुन्या एकमजली घरांत राहात होता. पेट्रोग्राद जिल्ह्यांतील, हम-रस्त्याच्या बाजूला, अशीं कितीतरी जुनी घरं आहेत. लढाया, क्रांत्या, यांचा या जुन्यापुराण्या घरांवर कांहीं परिणाम झाला नाहीं. त्या लहानशा घरापुढं एक बाग होती, नि त्या बागेंत, शेवाळ बाजलेलं असं जुनाट कारंज होतं. आतां

म्हणा, तें बर्फाखालीं पुरलं गेलं होतं, व या क्षणाला तर, तें घर,बाग किंवा कारंजं, यापैकीं कशाचाच विचार, कलावन्ताच्या मनांत येत नव्हता.

कलावन्ताच्या भोंवतीं, लोक आपसांत बोलत होते; भीति व आश्चर्याचे उद्गार उमटत होते, मुलांचे रडण्याचे आवाज येत होते, दाराची करकर चालू होती……कलावन्ताची या सगळ्याकडे अंधुक, अस्पष्ट अशी नजर होती. एखाद, काळाकुट्ट. लांबलचक पायघोळ झगा, आंगभर गुंडाळावा, अशी त्याची स्थिती झाली होती………

“कधींच मी लेनिनग्राद सोडून जायला पाहिजे होतं” कुणीतरी चिडून म्हणालं. “खरंच” कलावन्त मनांतल्या मनांत म्हणाला “काय खुळेपणा केला, मी इथं राहण्यांत; बरं त्यांत कांहीं भित्रेपणाचं लक्षण नव्हतं. त्याचीं पोस्टर्स अत्यंत लोकप्रिय झालीं होती. रस्त्यांत, क्लबांतून फार काय, आघाडीवरील खंदकांतमुद्धां, ती लावलीं होती. खरं होतं हें सगळं. पण तीं पोस्टर्स लेनिन ग्रादमध्येंच राहून रंगवायची, कांहीं जरूर नव्हती. फार काय, परिस्थिती तर अशी बिकट झाली होती, किं बोटं पार गारठून जाऊन, हातांत पेन्सिलमुद्धां धरतां येत नसे; बरं तो लहान स्टोव्ह काय शेक देणार? घर लहान असल्यानं त्याला बॉम्ब–आसरा नव्हता, आणि साहजिकच, प्रत्येक हवाई हल्ल्याच्या वेळीं, त्याला शेजारच्या मोठ्या ईमारतींत जाऊन, तळघरांत तास न् तास बसावं लागे. त्याला पडसं झालं होतं, खोकला झाला होता. तो दमून गेला होता, नि त्याला किती तरी तास, पोटभर जेवण मिळालं नव्हतं. त्याच्या सांध्यांतून चमक मारल्यासारखं होऊं लागलं. घरापासून आर्टिस्ट क्लबपर्यंत, त्याच्यानं चालणं कठीण झालं; त्यांतून ट्राम्स चालू नव्हत्या, आणि आतां तर दिवेसुद्धां नव्हते. तरी कुणी तरी त्याला म्हणालं होतं. “वोल्गापर्यंत जा, तिथं शहरां-तून दिवे आहेत; गरम उबदार खोल्या आहेत, व पुरेसे अन्न आहे.” वेळींच जे लेनिनग्राद सोडून गेले, असे त्याचे मित्र तिथं रहात होते. छट्! पोटांत अन्न नाही, थंडीनं जीव बेजार झालेला, अशा स्थितींत तास न् तास काळो-ख्यांत बसून डोक्यावर बॉम्ब कधीं पडणार, याची वाट पहात बसणं, हा शुद्ध

मधून मधून, घर वरच्या मजल्यापासून पायापर्यंत हादरत होतं. अशा वेळीं प्रत्येकजण अगदीं शांत असायचा, आणि नंतर जरा वेळ जो गोंधळ उडायचा, तो कांहीं विचारूं नका. काळोख तर अधिकच दाट होत चाललाय, असं वाटूं लागलं. किती वाजले असतील, ही गोष्ट, तर कलावंत साफ विसरून गेला होता. तो संध्याकाळीं बॉंब–आसऱ्यांत आला होता. आतां किती तरी रात्र झाली असेल ! हा हवाई हल्ला आतां अगदीं कंटाळवाणा झाला होता; किती तरी वेळ हल्ला चालला होता ! पुनः पुनः पुनः बॉंबचे स्फोट एकूं येत होते. "बॉंब टाकताहेत ते ! " तो कंटाळलेल्या स्थितींत, विचार करूं लागला. त्याचं आवडतं शहर, किती बदललं होतं, याचा विचार करूं लागलं, किं त्याच्या मनाला, असह्य यातना होत व डोळयांत अश्रु उभे रहात. किती दुःखी व दुर्दैवी घटणा ही ! आतां इतक्यांत हल्ला संपेल–" सब ठीक "चा इशारा मिळेल, आपण रस्त्यांत जाऊं, व पुनः कोसळलेलीं घरं, आगी, मोडतोड झालेल्या सामानाचं ढीग दिसतील......अहा ! त्या सुंदर खोल्या, पलंग, ती कपड्यांची कपाटं, भिंतीवरील त्या तसबिरी—क्षण-भंगुर मानवी जीवनाच्या, किती दुःखदायक स्मृति !

काळोखांतच एक लहानसं मूल, एका कोपऱ्यांत किंचाळत होतं. कलावंतानं काळोखांतच, त्या लहानशा मुलाचे पाण्यानं भरलेले टपोरे डोळे....याचं चित्र, डोळयांसमोर आणण्याचा प्रयत्न केला. कदाचित तें मूल झोंपेंतून, दचकून जागं आल्यानं व भोंवताली काळोख पाहून घाबरून रडत असेल, अशाच एका बॉंब–आसऱ्यांत, फक्त मेणबत्त्यांचा उजेड पडला आहे, असं काढूं कां मी चित्र ? लोकांच्या तोंडावर हलता प्रकाश फेंकणारी, मेणबत्तीची ती चंचल ज्योत, भिंतीवर पडलेल्या काळ्याकुट्ट छाया, बाहेर पडायला उत्सुक झालेल्या माणसांच्या आकृति, हिंवाळ्याचे गरम कोट घालून बसलेल्या म्हाताऱ्या, कोंपऱ्यांत कुजबुजणारे तरुण, लहान मुलांना छातीशी घट्ट धरून बसणाऱ्या त्या तरुण माता,......

अशा बिकट प्रसंगी, कलेवर मोठी प्रचंड जबाबदारी येऊन पडली होती. प्राचीन श्रेष्ठ चित्रकारांनी या युगांतील, अंधेर व प्रकाश, याचं निर्भय चित्रण केलं असतं. गोयानं ( सुप्रसिद्ध चित्रकार ) लेनिनग्रादचं, स्पष्ट व निर्भय चित्र काढून,

खालीं, त्याच्या नेहमीच्या पद्धतिप्रमाणं, शंभर वर्षांपूर्वी, तो जसं लिहित असे, त्याप्रमाणं, " हें मी पाहिलं," असं लिहिलं असतं.

इतक्यांत जिन्यावर प्रकाश दिसूं लागला. व दारांतून, "सब ठीक" इशारा ऐकूं आला. सरते शेवटीं हवाई हल्ला एकदांचा संपला.

कलावंतांनं बाहेर पडण्याची घाई केली नाहीं. सगळे लोक त्या अरुंद दारांतून बाहेर पडेपर्यंत तो आंत बसून राहिला होता; व सर्वांच्या शेवटीं, थंडगार भिंती चांचपडत तो बाहेर पडला.

रस्त्यावर आल्याबरोबर आपल्याला नासधूस दिसेल, अशी त्याला भीति वाटत होती. इथून थोड्याच अंतरावर असलेल्या, आपल्या घरीं, आपण रडतखडत कसे जाणार, याचा तो विचार करीत होता.

तो रस्त्यावर आला मात्र, आश्चर्यानं त्याची मती कुंठित झाली.

चंद्राच्या शुभ्र चांदण्यांत सर्व कांहीं न्हालं होतं. किती मनोरम, स्निग्ध चंद्रप्रकाश सर्वत्र पसरला होता ! पांढरी शुभ्र मेंढरं जमावीं त्यांप्रमाणं, आकाशांत ढग जमा झाले होते. थंड प्रकाशांनी आकाश भरून गेलं होतं. माळराना-जवळच्या उजाड भिंती, जणूं ब्रॉंझच्या आहेत कि काय, असा भास होत होता. चालतांना पायाखालीं बर्फ चुरत होतं. रस्त्यावर बर्फाच्या राशी जमा झाल्या असून, त्यांवर निळया मखमली छाया, चमकत होत्या... ...वास्तविक हें दृश्य नेहमीचंच होतं, पण आज त्याचं तेज कांहीं अवर्णनीयच होतं.

तो आपल्या घराजवळ गेला, पण तें त्याला ओळखूं येईना. तो बागेत आला, तेव्हां त्याला वाटलं, हें विलक्षण स्वप्न तर नव्हेना ? झाडां-वरून, जवळ जवळ तीन बोटं रुंदीचा बर्फाचा थर जमा झाला होता. झाडाची दरक फांदी, जणूं सुविख्यात चित्रकारानं विभूषित केल्याप्रमाणं, स्निग्धप्रभा फंकित होती. झाडांच्या शेंड्यावर, शुभ्र हिऱ्याच्या मुकुटाप्रमाणं, बर्फ सांचला असून, त्यावर चित्रविचित्र रंग चमकत होते. जणूं कांहीं एकाद्या नृत्यासाठींच तीं झाडं, आपापले अलंकार घालून व वेषभूषा करून, कलावंताचीच वाट पहात होतीं, व आतांच त्याचा हात धरून, अप्रतिम नृत्य सुरू करून, सभोंवार पांखरांची वृष्टि करण्याच्या विचारांत दंग होतीं.

या आश्चर्यकारक बागेच्या मध्यावर, एक अतिशय सुन्दर झाड होतं. त्याच्यावरील तेज, रंग, व प्रकाश, इतर झाडापेक्षां, हजार पटीनं अधिक होता ते झाड इतकं अप्रतिम दिसत होतं, किं मानवी कौशल्यालासुद्धां, त्याची प्रतिकृति करणं अशक्य होतं. झाडावर मंद, व आकर्षक तेज, चमकत होतं. पांढऱ्या शुभ्र अग्नितून ज्वाला याव्या, त्याप्रमाणं बर्फाच्या पट्टया दिसत असून, त्यावर अनेक रंग चमचमत.

कलावन्त मंत्रमुग्ध होऊन, स्तब्ध उभा राहीला. ती जागा कोणता, बागेंत आपण कसें आलों, किंवा आपण कुठं आहोंत, त्याला कांहींच कळेना.

त्यानं सभोंवार नजर फिरविली; लोक रस्त्यानं जात होते. तरुणांचं हंसणं, व त्यांच्या पायाखालीं चुरडणाऱ्या बर्फाचा आवाज, स्पष्ट ऐकूं येत होता. त्यानं लोंकरी टोपी काढली, व क्षणमात्र डोळे मिटून उभा राहिला. नंतर हळू हळू तो भानावर आला. डोळे उघडल्याक्षणीं, आपण भूतलावर आलों, असं त्याला वाटलं. तो आपल्या बागेंत असून, बर्फाच्छादित कारंजाकडे जात होता. बागेसभोंवार असलेलं कुंपण, आपण कसं बरं ओलांडलं? तें कुंपणच नाहींसं झालं होतं. बॉम्बच्या प्रचंड स्फोटामुळं, हवेच्या दाबानं, कुंपण उचलून, पार पलीकडे, रस्त्यावर फेंकून दिलं होतं. त्याच्यावरच्या जुन्या कुजट फळ्या, तर कुठच्या कुठं उडाल्या होत्या. तो अप्रतिम सौंदर्यनिधि,–तें कारंजाजवळचं, नेहमीचं सफरचन्दाचं झाड, जणूं विजयानं उभं होतं. इथंच, मध्यरात्रींत गुडुप झाल्यानं, शांत दिसणारं, असं त्याचं घर होतं.

चंद्राच्या मादक शुभ्र किरणांत न्हाणाऱ्या, शहराकडे त्यानं पाहिलं. खरो-खरच शहर, अवर्णनीय व अप्रतिम दिसत होतं.

आपण नवीनच जन्मलों आहोंत, व प्रथमच लेनिनग्रादचं दर्शन घेत आहोंत, अशा दृष्टीनं तो शहराकडे, टक लावून पहात होता. बॉम्ब–आसऱ्यांत त्याला ज्या भयाण विचारांनी भेडसावून टाकलं होतं, ते आतां साफ विरून गेले होते. काय, हें सुंदर जग, शौर्यस्थान, श्रम आणि वैभव याचं माहेरघर लेनिनग्राद, तें सोडून जायचं आपण?

छेः ! कधींही शक्य नाहीं !

शेवटच्या माणसाच्या जीवांत जीव आहे, तोंपर्यंत लेनिनग्रादचं संरक्षण केलंच पाहिजे; शरिरांत, रक्ताचा शेवटचा थेंब असेपर्यंत, लेनिनग्रादसाठीं लढलं पाहिजे. लेनिनग्रादच्या तटावरून, शत्रूला उचलून, मागं भिरकावून दिला पाहिजे. शत्रूचा पुरा नायनाट केलाच पाहिजे. पण लेनिनग्राद सोडायचं ! कदापि नाहीं ! कलावंत उभा राहून, लेनिनग्रादकडे पहात होता. त्याच्या आनंदाला, अभिमानाला, आश्चर्याला व सुखाला सीमा नव्हती !



# गनिमी सैनिक : : : : १२

**अँतन झिवेझ**. गनिमी सैनिकांच्या कोंडाळ्यांत उभा होता. त्यानं आपली टोपी हातांत काढून घेतली होती. इतर सैनिकांच्या प्रश्नाना उत्तर देतांना त्याला कमसंच होत होतं. त्याचं वय तिशीच्या सुमारास असून, डोक्यावरील केस इकडे तिकडे विखुरले होते, व गालांवर कित्येक दिवसांची वाढलेली दाढी दिसत होती. त्याच्या अंगात जुना कातड्याचा कोट होता. त्यावरूनच त्यानं एक दोरीचा तुकडा गुंडाळला होता. कांहीं असो, अँतनचा अवतार पाहून, हा गरीब, व शांत वृत्तीचा आहे, असंच कुणालाही वाटलं असतं, अँतननं जमिनीवर स्थिरावलेली नजर उंचावून, आपल्या दोस्तांकडे पहात हळूच म्हटलं:—

" तें खरं नाहीं रे ! मी शपथेवर सांगतों, खरं नाहीं तें ? "

त्याच्या निळसर डोळ्यांत अपमानाची छटा दिसत होती.

" बस्स, पुरे झालं ?" उंचेलेसा एक कोसाक म्हणाला. त्यानं आपली ऑटोमॅटिक रायफल हातांत घट्ट धरली, व उठून म्हणाला, " बस्स ! माझं एक. हें चालायचं नाहीं. आम्हीं तुला घेणंच अशक्य. चिकाटी म्हणजे काय तें

तुला ठाऊक नाहीं...छेः छेः ! तूं आपला दुसरं कांहीं तरी बघ—गनिमी सैनिकाचं काम तुझ्याच्यानं व्हायचं नाहीं."

"पण ईवान पेत्रोविच—हें बघ—झालं गेलं विसरून जा. माझ्यांत चिकाटी नाहीं, हें कशावरून ? मी तुम्हांला कधींही सोडून जाणार नाहीं ", अँतन किंचित काकुळतीच्या स्वरांत म्हणाला.

"काय, तूं आम्हांला सोडणार नाहींस !" गनिमी सैनिकांचा कमांडर, झाडाच्या बुंध्यावरून उठतां उठतां, अँतनकडे निरखून पहात, गंभीर स्वरांत म्हणाला. "अच्छा ! त्या दिवशीं आग—टेहळणीच्या बुरुजावर काय झालं तें सांगना यांना !"

कांहींजण हळूच मिस्किलपणं हंसले. अँतनचा चेहरा लालबुंद झाला. त्याला जुलै महिन्याची आठवण झाली. ती उन्हाळ्यांतील, दुपारची वेळ होती. अँतन बुरुजावर उभा राहून, कोसाकांच्या झोंपड्यावरून नजर फिरवीत होता. रस्त्यांवरून गाड्यांची रहदारी चालू असल्यानं, हवेत धुळीचे लोटच्या लोट उसळत होते. त्यांतून त्याला झोपड्यांचीं छपरं दिसत होतीं. त्याचं लक्ष रुपेरी दोन नदीकडे गेलं. त्याला अगदीं कंटाळा आला होता, व इथून खालीं कधीं उतरतों, असं झालं होतं. प्रत्येकजण कांहीं तरी उपयुक्त काम करीत होता. पण अँतन मात्र, आग–टेहेळ्या म्हणून, बुरूजावर उभा होता. तसं म्हटलं, तर त्या बुरूजाचा, गांवाला अभिमान वाटत होता. तो बुरूज अतिशय उंच असून, त्याच्या टोंकाला लांकडी कठडा केला होता, व त्याला हिरवा रंग दिला होता. तो बुरूज इतका उंच होता कीं, खालीं जमीनीवरून जाणाऱ्या येणाऱ्याला, वर उभा असलेल्या माणसाची, फक्त टोपीच दिसत असे.

अँतननं खालीं पाहिलं, तों त्याला दारूच्या बाटल्यांनीं भरलेली गाडी, दुकानाकडे जातांना दिसली. वरून त्या बाटल्या त्याला स्पष्ट दिसत होत्या. त्या पाहिल्याबरोबर, त्याला कमालीची तहान लागली. अँतन, पाईपचे झुरके मारीत होता. त्यानं पाईप तसाच कोटाच्या खिशांत ठेवला, कोट काढून, एका काठीला अडकविला, आणि वर टोपी ठेवून दिली. खालून पहाणाराला, अँतन ड्यूटीवर

आहे, असंच त्यांना वाटलं असतं. अँतन धडाधड बुरुजावरून उतरून, खालीं आला, व दारूच्या दुकानांत धांवला, आणि हातांत बाटली घेऊन परत फिरला.

पण इतक्यांत, जळत्या पाईपमधला तंबाखू, त्याच्या कोटाच्या खिशांत पडून कोट पेटला. बुरुजावर वारा सोंसाट्याचा असल्यानं, आग ताबडतोब पसरून बुरूज भडकला. गांवांत ओरडा ओरड, धांवपळ सुरु झाली. प्रत्येक जण बुरुजाकडे धांवला. सोवियत कौन्सिलचे अध्यक्ष व सभासद खालून मोठ्यानं ओरडत होते, "ए वेड्या, खालीं उतर! नाहीतर जळून खाक होशील!"

त्यांना ती टोपी पाहून, असं वाटत होतं, किं वर कुणीतरी आग विझविणाराच उभा आहे. तो खालीं कां उतरत नाहीं, याचं त्यांना आश्चर्य वाटत होतं. इतक्यांत अँतन आला, व घाबरलेल्या आवाजांत म्हणाला, "मी हा इथं आहे. वर आग विझवणारा कुणी नसून, माझीच कोट टोपी आहे." अध्यक्षाला, झालेला सर्व प्रकार, व अँतनची लबाडी समजली. अँतनला, ताबडतोब कामावरून बडतर्फ करण्यांत आलं, व ही सर्व हकीकत, साऱ्या वर्तमानपत्रांतून झळकली. अविश्वासू माणसाला, जबाबदारीच्या कामावर नेमल्याबद्दल, सोवियतच्या अध्यक्षाला ठपका मिळाला. त्यावेळेपासून, अँतन हा सर्व गांवकऱ्यांच्या चेष्टेचा विषय बनला. साहजिकच, अध्यक्षाचा अँतनवर बिलकूल विश्वास नव्हता. अँतनला हा सर्व प्रकार आठवला. तो स्तब्ध होता. त्यानं आपली कामगिरी बजावण्यांत चूक केली होती, यांत संशय नाहीं.

"असं आहे अँतन! आतां तूंच सांग. आम्हीं तुझ्यावर कां विश्वास टाकावा?" सोवियतच्या अध्यक्षानं विचारलं.

"त्या गोष्टीला आतां युगं लोटलीं."—अँतन आर्जवी सुरांत म्हणाला.

"त्यांत कांहीं अर्थ नाहीं,"—अध्यक्ष गनिमी सैनिकांच्या अधिकाऱ्याकडे वळून म्हणाला. "पण जर तुम्हीं म्हणत असाल, तर मात्र गोष्ट निराळी."

अधिकाऱ्यानं थोडा विचार करून म्हटलं, "अच्छा! मी अँतनची जबाबदारी घेतों. चला, आपण घेऊंया अँतनला गनिमी सैनिक म्हणून. माझ्याबरो-

वर तो टेहळणी करील. आम्हांला काम आहेच, आणि या भागाची बिनचूक माहिती, त्याच्या इतकी दुसऱ्या कुणाला नाहीं."

रानाजवळच, एका उध्वस्त झालेल्या घरांत, गनिमी सैनिकांची बराच वेळ मसलत चालली होती. शत्रूचा पेट्रोलचा सांठा उडवून द्यायचा होता. झोंपडी जवळून जाणारा रस्ता सुरक्षित आहे कीं नाहीं, हें दोघांनीं जाऊन तपासून यावं असं ठरलं, कारण त्याच रस्त्यानं, ही गनिमी सैनिकांची तुकडी जाणार होती. रस्ता जर निर्धोक असेल, तर जायला कसलीच हरकत नाहीं, पण जर नसेल, तर त्या दोन सैनिकांनी, परत बातमी आणली पाहिजे. न जाणों शत्रु आसपासच असायचा !

"हें पहा. आपल्यापैकीं मार्थुशा, त्या झोंपडीजवळच रहाते. तिला जातां जातां भेटा." अध्यक्षानें दोन सैनिकांना निरोप देतांना बजावलं.

अँतन व त्याचा म्होरक्या, दोघेजण झोंपडीच्या बाजूला गेले. म्होरक्या उंच गडी असल्यानं, लांब लांब पावलं टाकीत होता. त्याच्या बरोबर राहण्यासाठीं अंतनला धांवायला लागलं. वाटेंत त्यांना जाळून टाकलेलीं, पीकं काढण्याचीं यंत्रं. मोडतोड केलेले ट्रॅक्टर्स, व कोसळलेलीं घरं आढळलीं. एकही इसम त्यांच्या नजरेस पडला नाहीं. ते शेतावर जाऊन पोहोंचले: त्यांनीं पहिल्याच झोंपडीच्या दारावर थाप मारली. आंतून कांहींच उत्तर आलं नाहीं, ते आंत शिरले. त्याबरोबर, रायफलच्या तीन नळ्या त्यांच्या छातीवर एकदम रोखल्या गेल्या. जमिनीवर, रक्ताच्या थारोळ्यांत, गनिमी सैनिक मार्थुशा, अस्ताव्यस्त पडली होती.

म्होरक्या मागें सरकणार, तोंच बंदुकीचा दस्ता त्याच्या पाठीवर आदळला. ही चकमकीची सुरवातच म्हणाना. म्होरक्यानं अँतनकडे पाहिलं. अँतनचा चेहरा करारी दिसत होता.

तो जर्मन अधिकारी स्वच्छ रशियन भाषेंत म्हणाला "आम्हीं पकडलं आतां तुम्हांला."

म्होरक्या शांत होता. त्याच्या डोक्यांत एकच विचार घोळत होता,—शत्रु इथं आहे, हें आपल्या तुकडीला कसं कळवायचं—कारण जर त्यांना हा

निरोप गेला नाहीं, तर सबंध तुकडीच्या तुकडी, या सापळ्यांत येऊन पडायची. कुणीतरी चहाडी चुगली केली, हेंच खरं.

" बोल ! " मरून पडलेल्या माथुशाचा हात. बुटानं लाथाडीत, जर्मन अधिकारी ओरडला.

" महाराज, तुम्ही आम्हांला पकडलंत हें खरं नाहीं. कारण आम्हीं आपण होऊनच इथं चालत आलों. आम्हीं शरण आलों आहों, हे सांगायला आम्हीं इथं आलों आहोंत," अँतन म्हणाला. त्यानं गुडघे वांकविले व कपाळ जमिनीला लावलं.

म्होरक्या संतापानं दांतओठ खात, विचार करूं लागला. अँतनची ती शरण गेलेली मूर्ति पाहून, हा देशबुडव्या विश्वासघातकी आहे, असं त्याला वाटलं. अँतन पुन्हां बोलूं लागला. " आम्हां दोघांना पुढं पाठविण्यांत आलं असून, गनिमी सैनिकांची सबंध तुकडी शरण येण्यास तयार आहे. आम्ही तुम्हांला अटी विचारायला आलों आहोंत. आमच्यांतला एकजण इथं राहील, व दुसरा तुकडीला घेऊन येईल."

" आणि कमिसारचं काय ? " अधिकाऱ्यानं साशंक होऊन विचारलं.

आम्हीं त्याला सुद्धां इथं घेऊन येऊं ! "

अधिकाऱ्याला मनापासून आनंद झाला. कारण गनिमी सैनिक, हा एकटा असला, तरी देखील कधीं शरण येत नाहीं, आणि ही तर सबंध तुकडी शरण येणार होती. तो विचार करूं लागला:—" हा म्हणतो त्याप्रमाणं जर आलं, तर ठीकच—आपल्याला बढती मिळेल—आणि समजा फसलं, तरी हें कुणाला कळणार आहे ? "

" ए—खोटं नाहींना बोलत तूं ? याद राखून ठेव जर कां मला फसवलंस तर एकदां नाहीं, दहादां मी तुला ठार करीन, करवतीनं कापून तुझ्या शरीराचे तुकडे तुकडे करीन; बरं, कोण राहतोय् तुमच्यापैकीं ? "

म्होरक्यानं अँतनला मागं ढकललं, व आपण पुढं येऊन म्हटलं:—

" मी इथं ओलीस म्हणून राहतों. याला आणूं दे तुकडीला. "

" तूंच इथं रहा " असं म्हणत अधिकाऱ्यानं, अँतनला जोरानं डिवचलं. नंतर म्होरक्याकडे वळून तो म्हणाला, तुझ्या तुकडीला, घेऊन यायला, मी रात्रीं बारावाजेपर्यंत, वेळ देतों. जर ते ठरलेल्या वेळांत इथं आले नाहीत, तर त्याला तूं जबाबदार: मग मी या माणसाची स्पेशल व्यवस्था करीन."

अधिकारी झोंपडीच्या बाहेर पडला. म्होरक्यानं अँतनच्या तोंडाकडे आश्चर्यानं पाहिलं. जणुं कांहीं तो पहिल्या प्रथमच त्याला पहात होता.

सद्गदित आवाजांत तो म्हणाला,

" अच्छा ! अँतन, भेटूं आपण पुन्हां ! "

" अच्छा, " अँतननं निरोप दिला. तो वर मान करून, शेडमध्यें गेला. जर्मन संत्रीपहारेकऱ्यानं, धाडकन् दार बंद केलं. अँतन—कोमाक गनिमी सैनिक,—काळोखांत पडून राहिला. आंत भयंकर थंडी वाजत होती. सकाळ संध्याकाळ व्हायची, थांबली असावी असंच अँतना वाटलं; तो सारखा खोलींत येरझारा करीत होता; थंडी वाजूं नये म्हणून हात चोळीत होता; पाय आपटीत होता: रात्र झाली, सर्वत्र शांतता पसरली, त्यांच्याजवळ घड्याळ तरी असेल का ? निष्कारण मारणं अगदींच वाईट !

इतक्यांत दूरवर कसला तरी स्फोट झाल्याचा आवाज त्याच्या कानीं आला. अँतन दचकला व दाराच्या फटींतून बाहेर पाहूं लागला.

" वाः ! छान ! निदान त्यांनी आपली कामगिरी पार पाडली ! आतां मला स्वतःबद्दल विचार करायला कांहीं हरकत नाहीं. " असं स्वतःशींच पुटपुटत, अँतननं, शीळ घालायला सुरवात केली. काळोखांत त्याच्या हाताला लोखंडाचा एक लहानसा तुकडा लागला. तो घेऊन, त्यानं भिंतीला भोंक पाडायचा उद्योग आरंभिला—तोंच दार उघडलं, व शिपाई पुढं येऊन, त्यानं बंदुकीच्या-दस्त्याचा, अँतनला एक फटका दिला; अँतनला झोंपडींत खेंचून, एका बांकाला घट्ट बांधण्यांत आलं.

" गनिमी सैनिक कुठं आहेत ? " त्या जर्मन अधिकाऱ्यानं दरडावून विचारलं

अँतननं उत्तर दिलं नाहीं. त्याबरोबर अधिकाऱ्यानं हुकूम फर्मावला: एका जाडजूड जर्मन शिपायानं, अँतनचा हात गुडघ्याखालीं घट्ट दाबून धरला व करवतीनं, अँतनचं आंगठ्याजवळचं बोट, तो कापायला लागला. अँतनच्या कपाळावर घामाचे मोठमोठे थेंब जमा झाले होते. त्याचे डोळे निखाऱ्यासारखे लालबुंद दिसत होते. पण तो स्तब्ध होता.

"बोल, कोण आहेस तूं? कम्युनिस्ट? बोल्शेविक कमिसार?" फॅशिस्ट अधिकारी, सर्पाप्रमाणं फूत्कारत होता.

"मी रशियन आहे. मला कांहीच म्हणायचं नाहीं."

"आम्हांला सगळं सांग—आम्हीं तुला इनाम देऊं"—अधिकाऱ्यानं त्याला आमिष दाखविण्याचा, प्रयत्न केला.

ॲन्तननं, आपली सारी शक्ती एकवटून उत्तर दिलं:—

"तुम्हीं माझ्यावर तावा चालवूं शकत नाहीं. तुम्हांला माणूस म्हणणं देखील, चुकीचं आहे."

असं म्हणून, तो त्या अधिकाऱ्याच्या तोंडावर थुंकला.

पिसाळलेल्या त्या अधिकाऱ्यानं, आपलं रिव्हॉल्व्हर बाहेर काढलं.

इतक्यांत, खळकन् काच फुटल्याचा, आवाज झाला, व लागोपाठ गोळ्यांचे आवाज आले. अधिकाऱ्याचं डोकं भिंतीवर आदळलं, व तो जमिनीवर कोसळला. त्याच्या मागोमाग तो जाडजूड जर्मन शिपाई पडला. खिडकीच्या बाहेरून, कुणी तरी विचारलं, "ॲन्तन, जिवत आहेस कां तूं?"

गनिमी सैनिकांनीं, सबंध जर्मन तुकडीला कबजांत घेतलं होतं. ॲन्तनच्या बोटावर, प्रथमोपचार करण्यांत आला. इतक्यांत दार उघडून, सोवियतचा अध्यक्ष आंत आला. तो ॲन्तन समोर जाऊन उभा राहिला, व टोपी काढून म्हणाला:—

"भाई, तुझ्याबद्दल माझं मन साफ नव्हतं. म्हणून मला वाईट वाटत आहे."

ॲन्तन, उत्तरादाखल किंचित् हंसला मात्र.



# म्हातारा शिपाई : : : : १३

तो आतां इतका म्हातारा झाला होता, कि त्याला जेमतेम दिसत असे. खिडकीजवळ उभं राहून, तो बाहेर पाहणाऱ्यांजवळ, गेला, पण त्याला कांहीं दिसेना. शेवटीं त्याच्यानं राहवेना. तो म्हणाला

" तिकडे काय चाललंय् सांगाना. "

" दूरवर, शहरांतून धुराचे लोट वर येत आहेत, जणूं कांहीं पांढरेशुभ्र डोंगरच ! सूर्यास्तामुळं त्यांच्या कडा गुलाबी दिसत आहेत. धुराचा रंग, आतां हळू हळूं निळसर होत चालला आहे. किती उंच गेलेला दिसतोय् तो निळा धूर ! "

" काय ? आग लागली वाटतं कुठं ? " म्हाताऱ्यानं प्रश्न केला. " जर्म-नांचं कि काय हें काम ? "

" हं " त्याला उत्तर मिळालं.

विमानवेधी तोफांचे आवाज येत होते, पण त्यासुद्धां, आतां आळसावल्या

होत्या.........रात्रीं, तो नास् न नास्, नकाशा न्याहाळी. पूर्वी तो लष्करी शाळेंत, भूगोल शिकवीत असे: तसा तो शोधकही होता. त्याच्यापाशीं निरनिराळ्या नकाशांची, गुंडाळीच्या गुंडाळीं होती. निरनिराळे नकाशे, त्यावर दर्शविलेला, जमिनीचा उंचसखल भाग, हें निरखून पहात असतांना, त्याला इतर गोष्टींचा विसर पडे. नकाशांतील, या निळ्या पिवळ्या रंगाच्या तुकड्यामागं, त्याला—एका मोठ्या राष्ट्रांचं, जिवंत, स्वतंत्र, मोकळं व वाढणारं—असं जीवन आढळे. त्याचा नकाशा, दरवर्षी कसा बदलत चालला आहे याची त्याला जाणीव होती. आतां, त्याच्या डोळ्यांसमोर, लेनिनग्रादचा नकाशा पडला असून, त्याच्या कपाळावर, काळजीचं जाळं पसरलं होतं, व त्याची नजर गंभीर दिसत होती.

पुश्किनपार्कच्या बाजूनं, जर्मन सैन्य पुढं सरकत होतं. गॅचिनाच्या राजवाड्यावर, तोफांचा भडिमार चालू होता. पीटरॉफची लूटालूट झाली असून, कोलिपनोच्या आसपास मशिनगनचे, आवाज उमटत होते.

"छे! अगदींच अशक्य! तसं होणंच शक्य नाहीं! जर्मन, लेनिनग्रादमध्यें पाऊल टाकतील, ही गोष्टच शक्य नाहीं. कारण लेनिनग्राद, हे कुणाच्याही शत्रुला, कधींही शरण गेलं नाहीं. माझा यावर विश्वास बसत नाहीं—इतकंच नव्हे, तर मला ही कल्पना देखील करवत नाहीं. लेनिनग्राद, कधींही शत्रुला शरण गेलं नाहीं—त्रिवार नाहीं! आमच्या या वयांत आतां काळ, आम्हांला, लाजेनं मान खालीं घालायला, लावणार आहे काय?"

हातांतील सूक्ष्मदर्शक कांच, त्यानं तशीच खालीं टाकली, व संतापानं अस्वस्थ झालेल्या मनःस्थितीनं, खोलींतल्या खोलींत, येरझारा घालूं लागला.

"आणि शरण कुणाला जाणार? जर्मनांना? बायका—मुलांची निर्दयपणं अमानुष कत्तल करणाऱ्या, रक्ताला लालचावलेल्या पशुतुल्य फॅसिस्टांना!"

"छट्! शक्यच नाहीं!" तो स्वतःशीं पुटपुटला. "हे जर्मन सेनापती कळसूत्री—बाहुलीं आहेत. दुसऱ्यावर हुकमत कशी गाजवायची, याचं तर त्यांना बाळकडूच पाजलेलं असतं,—लढायचं पण त्यांना कळतं——"

"पण खरोखरच कां त्यांना लढतां येतं?" क्षणार्धांत, त्यानं स्वतःलाच विचारलं. "हे जर्मन म्हणजे बेदरकार जुगारी आहेत, आणि त्यांचे डावपेचमुद्धां, एकाद्या दरोडेखोराला साजतील, असेच आहेत. दुसऱ्याला गुंगवायचं, निशस्त्र करायचं, नाउमेद करायचं......ते जाउंद्या! पण म्हणावं, या वेळेला तुमच्या या लटपटी, इथं चालणार नाहींत! आम्ही भोटमामा लागून नाहीं गेलों, असे बनवायला! रशियन लोक, असे फसवणुकीला बळी पडणार नाहींत. याद राखा लेनिनग्रादमध्यें पाऊल टाकाल तर.—लेनिनग्राद तुमच्या हातीं पडणार नाहीं!"

तो बिछान्यावर पडला खरा. पण त्याला कांहीं केल्या, झोंप येईना. शहराभोंवतीं लढाई चालू आहे, हा विचार त्याच्या मनांत आला, कि त्याचं सर्वांग थरारून जाई. त्यानं डोळे मिटून धरले, कि त्याच्या डोळ्यासमोर, पन्नास वर्षांपूर्वी, शांततेच्या काळीं, तो अधिकारी असतांवेळचं चित्र उभं राही. त्यावेळीं तो लढाईच्या हालचालींत भाग घ्यायचा. त्यावेळचीं आपलीं सर्व स्थळं अग्निच्या भक्षस्थानीं पडून, त्यांतून धुराचे लोट उठताहेत! काय तरी भयंकर विचार!—छे! कदाचित् शत्रुचे रणगाडे, शहराच्या आसपास देखील घुसले असतील......तसं झालं असलं तर!—लक्षांत असूं द्या. या जुन्या खोडाच्या मनगटांत, हात वाद भिरकाविण्या इतकी, ताकद खात्रीनं शिल्लक होती!—

"किती हात बॉंब आहेत!" असे शब्द त्यावेळीं त्याला सुचले नसते: पण डोळे अधू असले, तरी, "आहेत कुठं ते हात बॉंब!" असंच त्यानं दरडावून, विचारलं असतं. पण तें कशाला पाहिजे! शहराचे रस्ते, जर्मनांच्या पायांनीं विटाळतील, हें कालत्रयींही होणं शक्य नाहीं!

हवाई—हल्याचा भोंगा वाजूं लागला, तरी हा म्हातारा कांहीं, आसऱ्याच्या जागीं गेला नाहीं. धक्क्यामुळं घर थरथरत होतं, छपरावर बॉंबच्या तुकड्यांचा, नुसता पाऊस पडत होता, खिडक्या खळखळत होत्या, पत्र्याच्या घराप्रमाणं घर हादरत होतं, पण "उडा! खुशाल उडा गिधाडानों, पण लवकरच तुमच्या माना मुरगळल्या जातील, हें ध्यानांत ठेवा!" हेच उद्गार, त्याच्या तोंडून बाहेर पडले.

लढाईची धुमश्चक्री चालूच होती. लेनिनग्रादच्या तटबंदीच्या बाहेर, शत्रू पाय रोवून बसला होता. त्यांतच हिवाळ्याचे दिवस आले. घरांत सर्वत्र काळोख पडला, व थंडीनं दांत कुडकुडूं लागले. लहानशा शेगडींत टाकलेल्या लांकडांच्या ढलप्यानं, थंडीचा कडाका कितीसा हटणार? म्हाताऱ्याची अवस्था दिवसेंदिवस बिकट व्हायला लागली. आंगावर ब्लँकेट लपेटून, तो गतायुष्याचा, चित्रपट पहात पडायचा. तसं पाहिलं, तर त्याचं आयुष्य उद्योगी व आनंदी होतं—आणि ही जर धामधूम नसती, तर तो सुखानं कितीतरी दिवस जगला असता, पण म्हातारपणामुळं त्याचे हातपाय थंडावत चालले होते. शेगडींत टाकायचीं, चार फाटीं फोडलीं, तर त्याचा जीव घाबरा होई—कुणाला हें सांगायचीमुद्धां त्याला शरम वाटायची!

खिडकीबाहेरील, भव्य टोलेजंग शहरांतील, जीवन व संग्राम याविषयीं एकसारखे त्याच्या मनांत विचार येत. मधून मधून आसपासच्या रस्त्यांत तोफेचे गोळे येऊन पडत. त्यांच्या धडाक्यानं तर तो अधिकच बेचैन व चिडखोर बने.

आपल्या आयुष्याचा, विशेषतः या म्हातारपणाचा, त्याला वैताग आला, कि, टेबलाच्या खणांतील सोन्याचं घड्याळ काढून, त्याच्याकडे टक लावून पहाण्यांत, त्याला अतिशय आनंद होई. वरिष्ठ लष्करी शाळेंत, त्यानं अनेक वर्षं, शिक्षक म्हणून केलेल्या कामाची, एक आठवण म्हणून, त्याला हें सोन्याचं घड्याळ, बक्षिस देण्यांत आलं होतं. त्याच्या हाताखालून कितीतरी तरूण, धाडसी, चलाख अधिकारी गेले होते... ...त्यांचे हंसरे चेहरे त्याच्या डोळ्यापुढं चमकूं लागले; त्यांचे मोठमोठ्यानं चालणारे वादविवाद, तारुण्यसुलभ मनमोकळी स्वच्छंदवृत्ती, या सर्व गोष्टी त्याला आठवूं लागल्या.

...आपण स्वतः चपळ घोड्यावर स्वार होऊन, कॉकेशसच्या डोंगर-कपारींतून खळखळणाऱ्या नदीओढ्यांच्या बाजून चाललों आहों...प्रवासी, डोंगरी लढायांचे इतिहासकार—पण जाउंद्या ते दिवसही निघून गेले.

तो आतां अतिशय क्षीण झाला होता. जेवतांना, घांस उचलून तोंडांत घालण्याची शक्ति, त्याच्या हातांत राहिली नसून, त्याची मुलगी त्याला भरवीत

असे. भरवितां भरवितां, ती त्याला रणक्षेत्राच्या आघाडीवर काय चाललं आहे याची बातमी देई.

"काय माघार ! एकसारखी पिछेहाट !" जड विश्वास सोडीत तो म्हणायचा. बोलतां बोलतां, बहुतेक अंध झालेली दृष्टी, दुखानं त्याच्या मुलीकडे लागलेली असे.

"म्हातारा आतां थोड्याच दिवसाचा आहे–" शेजारपाजारी म्हणत... एके दिवशीं सकाळीं, मुलीला आपल्या बापाच्या खोलीतून, चमत्कारिक आवाज ऐकूं आला...प्रथम--कुणीतरी करवतीनं, कांहींतरी कापीत असावं, असा आवाज आला, नंतर हातोडीनं ठोकल्याचा व शेजारी कुणीतरी गाणं म्हणत असल्याचा,.........हं हं...बरोबर, कुणींतरी त्याच्या खोलींत गाणं म्हणत असलं पाहिजे... ...गाण्याचे शब्द कांहीं स्पष्टसे ऐकूं येत नव्हतें... ... इतकंच काय, त्या गाण्यांत शब्द होते किं नाहीं, हें सांगणंसुद्धां कठीणच होतं. कामांत गुंग असलेला माणूस, ज्याप्रमाणं एकाद्या गाण्याचे सूर गुणगुणतो त्याप्रमाणं त्या गाण्याचा आवाज येत होता.

तिला असं साहजिकच वाटलं, किं यावेळीं, आपले वडील, जुनाट रग पांघरून पडले असतील. अगदीं टेकीस आलेले, चिरचिरे बनलेले, असेच ते झाले होते.

ती दाराजवळ जाऊन, थोडावेळ थबकली. दार उघडावं किं नाहीं, असा तिच्या मनांत विचार आला. दार उघडून पहाते, तो तिचा वयोवृद्ध पिता. एका हातांत करवत घेऊन लांकूड कापीत आहे, व स्वतःशींच गाणं गुणगुणत आहे. हो ! खरंच ! तेच--तिचे वडील गाणं म्हणत होते. गाणं गातांनां, त्यांच्या नजरेंत निराळीच चमक तरळत होती.

त्यांच्या आंगावर, नुसता भलामोठा डगला होता, तरी ते एकाद्या पूर्वकालीन वयोवृद्ध, भव्य जनकाप्रमाणं, शोभून दिसत होते.

"बाबा, तुम्हांला झालंय् तरी काय ? हें तुम्ही आरंभलंय् तरी काय ?" ती भीतिनं ओरडली, "तुम्ही बिछान्यांतून कां उठलेत ? आणि ही लांकडं कापण्याची काय जरूर ? हें काम करण्याइतकी ताकद, तुमच्यांत नाहीं !"

त्यानं एकवार तिच्याकडे नजर फेंकली, व खणखणीत आवाजांत म्हणाला, "आज सकाळीं, रेडिओवर काय सांगितलं तें ऐकलंस, नाहीं वाटतं तूं ?"

"नाहीं— काय सांगितलं ?"

एका हातांत फळी, व दुसऱ्या हातांत करवत घेऊन, त्याला उडीच मारायला लागली.

"आश्चर्य आहे ! तूं ऐकलंस नाहींस ? सबंध जगाला तें ऐकूं गेलं, नि तुला अजून त्याची दाद नाहीं ! जर्मनांचा मॉस्कोला पराभव झाला ! साफ चक्काचूर झाला……हलकट दरोडेखोर ! मी नेहमीं म्हणत असें, हे भुरटे चोर—हे लढायचे पण दरोडेखोरासारखेच ! यांच्या हालचाली आणि हिकमती डाकूप्रमाणेंच ! या भुरट्यांची हकालपट्टी करण्यांत आली, समजलीस ? मॉस्कोला जर त्यांना इतका जबरदस्त तडाखा बसला, तर म्हणावं, बेट्यांनों, लेनिनग्रादचं नांवच सोडून द्या. ही बातमी कानांवर पडली मात्र, माझ्याच्यानं कांहीं बिछान्यावर पडून राहवेना. आनंदाच्या भरांत मी उडी मारली—खरोखरच पोरी, मी—या तुझ्या म्हाताऱ्या बापानं, उडी मारली. मी उडी मारून मोठ्यानं ओरडलों,—"विजय चिरायु होवो !" कायग पोरी, हे शब्द कांहीं बिछान्यावर पडून ओरडायचे नाहींत,—नाहीं काग ?"



# आई : : : : १४

“ चला, आपण त्यांना भेटायला जाऊं. ” आई म्हणाली. तो कोण, हें आईनं जरी स्पष्ट केलं नसलं, तरी तिची मुलगी ओल्गा, हिला तें ताबडतोब समजलं.

तो म्हणजे, दुसरा तिसरा कुणी नसून, स्वयंसेवक म्हणून, सैन्यांत नवीन दाखल झालेला तिचा भाऊ, बोरिस हा होय. “ संस्थेंतील इतर सर्वांप्रमाणं, मी सुद्धां सैन्यांत जाणार, ” असं तो म्हणाला होता. त्याच्यासमोर त्याची आई उभी होती–बोरिस हा चिंताक्रान्त, पण करारी असा दिसत होता.

“ पण तुझी दृष्टी तर अधू आहे, आणि त्यांतून तुझी ही अशी फाटकी शरीरप्रकृति ! तुला भीति नाहीं वाटत बोरिस ? ” आईनं प्रेमानं विचारलं.

“ आई, त्याची नको तुला काळजी ”—बोरिसनं बेधडक उत्तर दिलं.

“बरं, तूं कधीं लढाईवर गेलेला नाहींस–तेव्हां तुला फार त्रास होईल..

“ तूं बिलकूल काळजी करूं नको ग आई ! ” तो आपली शिपायाची पिशवी भरतां भरतां, उद्गारला.

……ज्या खेड्यांत तो लष्करी शिक्षण घेत होता, तिथं त्याची आई नि ओल्गा, कितीतरी वेळां भेटायला गेली होतीं. तो कवाईत संपवून आलेला असायचा, त्यावेळीं दमलेला, धुळीनं माखलेला, काळसर पडलेला, व आनंदी असे. मग तो, आई नि ओल्गा, शहरच्या, आपल्या मित्रांच्या–दोस्तांच्या गप्पः मारीत बसत, पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, ते लढाईसंबंधीं चकार शब्दसुद्धां, बोलत नसत. कारण त्यांच्या भोंवतालचं सर्व वातावरण, शौर्यानं नि कृतींनं रसरसलं होतं.

ओल्गा अजून ल्हान मुलगी होती. त्यामुळं भावाला भेटायला जाणं, यांत तिला कांहीं विशेष वाटत नसे. मागं नव्हतों कां आपण, उन्हाळ्याच्या दिवसांत शेजारपाजारच्या खेड्यांत जात, त्यांतलंच हें. संध्याकाळीं, विजेच्या गाडींतून, त्या, युद्धामुळं धुंदली व गडबडीनं भरलेल्या शहरांत येत, व त्यांच्या दोन्ही हातांत, मावतील तितकीं, शेतांतील रानटी फुलं असत.

अलीकडे मात्र, हें सर्व बदललं होतं. युद्धाची आघाडी, आतां फार दूर राहिली नसून, हळुहळू शहराजवळ येत होती. ओल्गाची मुद्रा हल्लीं चिंताक्रांत दिसूं लागली होती. मागं आपण रविवारी बोरिसला भेटायला जात असूं, त्यावेळची परिस्थिती निराळी होती. 'आज बोरिस कसा दिसेल बरं आपल्याला!'

तीं ओसाड शेतांतून चाललीं होतीं. उन्हाळ्यांत राहाण्याचीं सर्व घरं, भरलीं होतीं. जातां जातां, गाड्या, मोटारगाड्या, त्यांना विरुद्ध दिशेनं, जातांना आढळल्या. सर्व रस्ते, निर्वासितांनीं नुसते फुलून गेले होते. लहान लहान मुलांच्या हातांत, व पाठीवर पिशव्या दिसत होत्या. जवळच्या एका खेड्यांत, एका घोड्याचं मढं पडलं होतं. त्याच्या तंगड्या वर दिसत होत्या. लाल फलटणीचे शिपाई बाजूनं जात असून, त्यांच्या शिरस्त्राणांचा आवाज होत होता. आसपास, जवळच कुठंतरी, सारखा चालू असलेल्या गोळीबाराचा, आवाज कानांवर पडत होता.

तो गडबडीचा रस्ता त्यांनीं केव्हांच मागं टाकला.

ते आपल्या ओळखीच्या घोड्यांच्या वाटेनं जात होते. पण आजुबाजूचं वातावरण, चमत्कारिक व अनोळखी, दिसत होतं. जागोजागीं मोडलेलीं कुंपणं दिसत; चिटपांखरू दिसायची मारामार; सर्वत्र कसलीतरी भीति पसरलेली

दिसत होती. त्यांना, आतां कांहीं तरी भयंकर प्रसंग घडणार, असं राहून राहून वाटत होतं. शेतांत, लालसैनिक मशीनगन्स घेऊन, झुडुपामागं दडून बसले होते. त्यांनीं पहिल्याच गांवात पाऊल टाकलं तों काय, सबंध गांवच्या गांव उजाड झालेलं ! एक चिमणी दाणा टिपतांना दिसेना, कोंबडी कीं कुत्रा नजरेस पडेना ! कुठल्याही स्वयंपाक घरांच्या धुराड्यांतून, धूर वर जातांना दिसत नव्हता. घरासमोरील बांकावरून, सगळा शुकशुकाट होता. पांढऱ्या शुभ्र रात्रीं, पहाटपूर्वीं जेव्हां सर्वजण झोपीं गेलेले असत, त्यावेळीं गांवं अशीं दिसायची. पण आतां, कुणीही झोपलं नव्हतं—ही स्मशान शांतता होती.

या भीषण शांततेत, ओल्गाची आई, पाऊल न वाजवितां धीमेपणानं चालली होती, व ओल्गा आईच्या मागोमाग जात होती.

दुसरं गांव, तर आगीनं भडकलं होतं. लहानशी टेकडी चढल्यावर, ती आपोआपच थांबली. घरांवरून आगीच्या ज्वाळा, लाल आयाळीप्रमाणं हेलकावत होत्या. त्या विझवायला जवळपास कुणी नव्हतं. कित्येक झोंपड्याची दुर्दशा झाली होती...हें दृश्य पाहून कुणालाही आश्चर्य वाटलं असतं—दयेनं त्याचं अंतःकरण द्रवलं असतं. ओल्गानं भीतभीतच, आईची बाही ओढली. पण ती शांतपणं म्हणाली, 'कसंही करून आपण त्या कुंपणापर्यंत गेलंच पाहिजे.' अशा रीतीनं त्या दोघीजणीं, जळत्या घराच्या रांगामधून, त्या गांवरस्त्यानं चालूं लागल्या. जातांजातां, ओल्गाचं लक्ष घरांच्या जळत्या खिडक्यांकडे गेलं. तिथं तर जाळ नुसता उमळला होता. तिच्या डोळ्यांदेखतच, घरांतील एका पडद्यानं पेट घेतला, आंतली भिंत कोसळली, आणि जळक्या खिडक्यांतून, ठिणग्यांचा पाऊस पडूं लागला. आपण खरोखच हें पाहतों, कीं स्वप्नांत आहोंत म्हणून, तिनं एकाद्या शाळकरी पोरीप्रमाणं दंडाला चिमटा देखील घेतला. आपल्या रोजच्या ओळखीचींही घरं, या जागा—या अनोळखी व परक्याच्या कशा वाटूं लागल्या, हें तिचं तिलाच समजेना. टेकड्यांच्या आसपास सर्वत्र रान पसरलेलं होतं,—त्या रानामागून आतां काळ्या निळ्या धुराचे लोटच्या लोट उसळत होते. हवेंत जळके कागद, गवताच्या काड्या, व दोरीचे तुकडे, उडतांना दिसत होते. गवताच्या, गंज्या धडकत होत्या, व त्यातून चमत्कारिक निळसर धूर, वर चढतांना दिसत होता. एका डब्याजवळ

शेड होती—त्या शेडच्या छपराचे निखारे पाण्यांत पडून विझत. व विझतांना हिस्सूस्स् असा आवाज येई.

शेवटीं तीं. गावांत पोंचली: व खोलगट अशा वाटेनं जातात, तों वाटेंत मेलेली गाय पडल्यानं, वाट बंद झाली होती. गाय एका कुशीवर पडली असून तिच्या तांबूस पाठीवर. काळ्या माशा घोंघावत होत्या. तिच्या आंतड्याचे तुकडे वाटेत पडले होते, त्याच्याच जरा पुढं खटारा उभा होता, व त्यांत, खोरीं आणि पावडीं, दिसत होतीं. मागील चाकाच्या जवळ, आश्चर्यानं जणूं हात पसरले आहेत, अशा स्थितींत, एकजण आडवा पडलेला होता. तो मेला होता. त्याच्या तोंडावर काळे वळ उठलेले होते. त्याला, जणूं कुणी चाबकानं बेदम फोडून काढलं होतं. त्याच्या. एका डोळ्याच्या ठिकाणीं मांसाचा काळा गोळा दिसत होता—त्याचा दुसरा डोळा उघडा असून, तो पाहूनच ओल्गाला आश्चर्याचा धक्का बसला !

हें भीषण दृश्य टाकून, तीं चार पावलं गेलीं नसतील, तोंच कर्कश व वाढता आवाज, त्यांना एकूं येऊं लागला. आवाज इतका जोराचा व कर्कश होता, कीं कानांत बोटं घालून, ते बंद करावे असं त्यांना वाटलं. आई जागच्या जागीं थांबली, व तिनं डोकं खालीं वांकविलं. ओल्गानं पण तसंच केलं. हें वागणं चूक असून, रस्त्यांत पडून तोंड जमिनीजवळ धरणं. हेंच बरोबर हें तिला माहीत होतं. पण त्यांना बोरिसला भेटायचं होतं ना ! मग प्रत्येक तोफेच्या गोळ्यावेळीं, जर त्या खालीं पडून रहायाला लागल्या. तर कसला बोरिस, नि कसलं काय ?

तोफेचा गोळा, एका लहानशा उंचवट्यामागं पडून फुटला. फुटल्याबरोबर. मातीचा जो लोट हवेंत उसळला, तो हळुहळू ओसरला न ओसरला, इतक्यांत. मघांच्या त्या खटाऱ्याजवळ, आणि मेलेल्या माणसाजवळ. दुसरा गोळा येऊन पडला. पण तीं एव्हांनां, कितीतरी पुढं गेलीं होतीं. ज्वालांची लाल छटा असलेले धुराचे काळे लोट, एकसारखे येऊं लागल्यानं तीं धांवूं लागलीं: वाटेंत ती झुडुपांशी, कितीदांतरी धडपडली. ओल्गाचे हातपाय , लटलट कांपत होते. तिचं तोंड सुकून गेलं होतं पण आई मात्र धीटपणानं पुढं सरसावत होती, व

" ते आपल्याला मारणार नाहींत--मारणं शक्यच नाही--मारतां कामा नये, "–असा कांहींसा वेडगळ विचार करीत, ओल्गा आईच्या मागोमाग चालली होती.

बोरिस ज्या गांवीं रहात होता, व जिथं त्यानं लष्करी शिक्षण घेतलं होतं, तो गांव अगदीं अदृश्य झाला होता. तिथं, जागोजाग काळे–जळके खांब उभे होते, व जळक्या फळ्यांच्या राशी पडल्या होत्या. झाडंसुद्धां जळून खाक झालीं होतीं किंवा मुळासकट उपटून पडलीं होतीं, व तोफेच्या गोळयामुळं पडलेल्या, व हिरवटसर पाण्यानं भरलेल्या डबक्याजवळ, अस्ताव्यस्त पडलीं होतीं.

" ओल्गा, आतां कुठं जायचं ? " आईनं विचारलं. आई स्तब्ध राहिली. दमलेल्या पण करारी, अशा आपल्या आईकडे पाहून, ओल्गाला तिची दया आली.

" आई, चल आपण घरीं परतुया. तूंच पहाना, पुढं जाण्यांत काय अर्थ आहे ? "

" चल ग, थोडं पुढं जाऊन कुणाला तरी विचारू या. "

पुनः त्याँ शेतं तुडवीत चालूं लागली. वाटेंत मोडतोड केलेलीं कुंपणं, व उध्वस्त झालेलीं गांवं लागलीं. गवतांत दबा धरून बसलेले, खंदकांतून बसलेले–सगळीकडे, लाल सैनिक, असून त्यांचं लक्ष डाव्या बाजूला होतं. एकदम एका लहानशा न्हाणीघरांतून, तिघंजण बाहेर आले. आई, एकदम आनंदानं, त्यांच्याकडे धांवली, व एका किडकिडीत पण उंच सैनिकाला, म्हणाली " कायरे, मला वाटतं, पॉल ना तूं ? "

आश्चर्यानं, त्याचे डोळे एकदम विस्फारित झाले. थोडावेळ, त्यानं समोर असलेल्या बाईच्या, लहानशा आकृतिकडे, टक लावून पाहिलं, व नंतर म्हणाला " हां हां ! काय ग तूं बोरिसची आई, नाहीं का ? "

" हो ?...मला बोरिसला भेटायचंय्. कुठं बरं असेल तो ?... "

" कुठं असेल ? " पॉलला धक्का बसल्यासारखं झालं. "अशीच सरळ त्या टेकडीच्या बाजूला चालत जा...पण नका, तुम्हीं पुढं जाऊं नका...तो सांपडणं कठीण आहे...शिवाय "...तो किंचित् हंसून म्हणाला, "असं आहे कीं त्या बाजूला लढाई चालू आहे...आपल्याला शत्रूंनीं जवळ जवळ घेरलंय्. आणि तुम्हीं इकडं कुठं भटकतां आहां ? "

" भटकत नाहीं आम्ही !... मला बोरिसला भेटलंच पाहिजे..."

हे वाक्य, आई अशा कांहीं प्रेमळ व गंभीर आवाजांत म्हणाली कीं, बोरिसबरोबर शिक्षण घेतलेला, व बोरिसच्याच तुकडींत असलेला पॉल, नुसतं म्हणाला, " बरं, चला पुढं..."

......आई तिथंच गवतांत, म्हाणीघराच्या फळ्यांना पाठ टेकून, बसली. ओल्गा मुठींत जीव धरून तिच्यापाशीं बसली. समोरच पसरलेल्या, खुरटलेलीं झुडुपं वाढलेल्या, दलदलींत भरलेल्या, व लहान चमकदार ओहोळ वाहणाऱ्या शेताकडे, लालसैनिकानं बोट दाखविलं. शेताच्या पलीकडे दूरवर रान असून, टेकडीवर एक गांव दिसत होतं. डोळे दिपवून टाकणाऱ्या मेघगर्जनेनं, तें सर्व वातावरण भारून टाकलं होतं, असं म्हटलं तरी चालेल. उंचावर झाडींत बसलेल्या त्या गांवावर, आमचा तोफखाना पिछाडीवरून भडिमार करीत होता. ओल्गा व तिची आई, ज्या उंचवट्यावर बसली होती, त्या ठिकाणीं जाणाऱ्या सर्व वाटा, व ते दलदलीचं शेत, यांवर जर्मन तोफा आग ओकीत होत्या.

" आतांच हल्ला केलाय् त्यांनीं"—लालसैनिक म्हणाला " तुम्हांला वाटलं तर इथं थांबा, किंवा थांबू नका, तें तुमच्यावर आहे. ते त्या बाजूला गेले... त्यांनीं हल्ला चढवलाय्."

" बोरिसला ओळखतोस् तूं ?" आईनं विचारलं.

" हो तर ! ओळखतों म्हणजे काय ? तो त्यांच्या बरोबरच आहे"

" त्याची नेमबाजी कशी काय आहे ?"

" तो कांहीं तसा वाईट निशाणबाज नाहीं."

" कायर, भेकड आहे का बोरिस ?"

तो लालसैनिक म्हणजे मुलगेलासाच होता. त्यानं खांदे उडविले. त्याला वाईट वाटल्यासारखं दिसलं. " अहो, बोरिस जर भेकड असता, तर आम्हीं त्याला आमच्या तुकडींत कधींच घेतलं नसतं..."

दोघंही जरावेळ कांहीं बोलली नाहींत. स्तब्धपणं तो टेकडीवरील, जळणाऱ्या गांवाकडे टक लावून, पहात होतीं. मधूनच रानांतून " हुर्रा " असा आवाज येई. पण शब्द मात्र स्पष्ट समजत असत, आगीमुळं. रान रक्तानं जणूं

न्हाल्यागत दिसत होतं, " किती भयाण तरी ! " असं ओल्गाच्या मनांतून म्हणायचं होतं. पण ती म्हणाली.

" काय तरी विचित्र ! "

आई उठली व टेकडीच्या कडला आली: लढाईत, चिंध्या उडणाऱ्या त्या रानांत, आई आपल्या मुलाला बोरिसला, शोधीत होती... तिला जणूं वाटत होतं, कीं हातांत बंदूक घेऊन, बोरिस त्या जळणाऱ्या गांवाकडे धांवतांना आपल्याला दिसेल. ती कितीतरी वेळ तशीच उभी होती. ओल्गाला आपली आई देवभोळी नाही, हें जर माहीत नसतं, तर ती देवाचा धांवा करण्यांत गुंतली आहे, असंच तिला वाटलं असतं..."

जरा वेळानं ती ओल्गाला म्हणाली "चला जाऊंया !" भोंवतालीं न बघतां, रस्त्याला मिळणारी वाट, ती चालूं लागली.

" त्यांच्यासाठीं थांबणार नाहीं तुम्हीं ? " लालसैनिकानं विचारलं.

" नाहीं. तुम्ही आम्हाला फार चांगलं वागवलंत. त्याबद्दल, आम्ही आभारी आहोंत. बरं आहे, ओल्गा चला जाऊं या."

तीं रस्त्याला लागलीं.

" ओल्गा, पोरी पाय दमले असतील ना, तुझे ? "

" छे ग ! पण आई, मला वाटतं, आपण यांतून जिवंत बाहेर पडणार नाहीं. मला इतकं भय वाटतंय्."

आईच्या रक्तशून्य ओठांवर हास्य उमटलं.

' ओल्गा, भिऊं नको—आपल्याला कांही व्हायचं नाहीं.' जरावेळ थांबून. ती बोलूं लागली, ' ओल्गा, आतां माझं मन जरा शांत झालंय्. मला एकसारखं वाटायचं, कीं बोरिस अशक्त आहे, लढाईला नालायक आहे, त्याचे डोळे अधू आहेत. म्हणून, मी स्वतः येऊन पहायचं ठरवलं, आतां मला कळलं, कीं माझा बोरिस, एकाद्या तरबेज सैनिकाप्रमाणं लढत आहे. हेंच मला पाहिजे होतं. चला घरीं जाऊं आतां आपण. आपल्याला लवकरच घरीं पोचलं पाहिजे; नाहींतर काळोख पडायचा, नि मग तुला रात्रपाळी पण करायची आहे.'

असं म्हणून ती झपझप पाय उचलून चालूं लागली.



## लाल झेंडा : : : : : १५

( ही कथा, प्रत्यक्ष घडलेल्या एका प्रसंगावर लिहिली आहे. )

बेटाच्या मधोमध, दगडी पाट्यांचीं छपरं असलेलीं, कांहीं घरं होतीं. त्यांच्या वरच्या बाजूला, उंच असं चर्च असुन, त्याच्या निमुळत्या शेंड्यावर काळा क्रॉस होता; करड्या आकाशाच्या पार्श्वभूमीवर, तो काळा क्रॉस उठून दिसे.

बेटाचा दंतुर किनारा उजाड दिसत होता. आसपासचा समुद्राचा, सुमारं शंभर मैलांचा टापू देखील, निर्जिव असा दिसे. पण वस्तुस्थिती मात्र निराळीच होती.

दूरवर पसरलेल्या अथांग दर्याच्या क्षितिजावर, मधूनच, आरमारी किंवा मालवाहू जहाजाची पुसट आकृति दिसे, त्यासरशीं एक अजस्त्र दगडी शिला, बिलकुल आवाज न करितां, ताबडतोब बाजूला होई. हें सर्व इतक्या चटकन् व सफाईनं होई, किं–हें स्वप्नांत किंवा परिकथेंत तर घडत नाहींना, असंच कुणाला वाटलं असतं. त्या शिळेच्या आड गुहा होती, व तिच्या पंजातून सावकाश,

तीन लांब पल्ल्याच्या तोफा डोकावूं लागत......हळूहळू त्या, समुद्र पातळीच्या बऱ्याच वर येऊन, पुढं सरकत व थांबत. या तीन तोफांचीं लांबलचक तोंडं,– शत्रु-जहाजांच्या हालचालीं बरहुकूम, आपोआप वळत. शत्रूचीं जहाजं, त्यांची तोंडं लोहचुंबकाप्रमाणं, आकर्षून, हवीं तशीं वळवीतच होती जणूं? तोफांचे मजबूत, पोलादी भाग, व वाटोळ्या फिरक्या, यांवर दाट हिरवंगार तेल चकाकत होतं.

डोंगराच्या त्या कड्यांत, खोल्या खोदल्या असून त्यांत, किल्ल्याची शिबंदी, धान्याचा सांठा व हत्यारं ठेवलीं होतीं. सर्वजण खान्याला बसत. त्याच खोलींत, एक पातळ लांकडी पार्टिशन घालून, दोन अरुंदशा खोल्या बनविण्यांत आल्या होत्या, इथंच, किल्ल्याचा कमांडंट, व कमिसार रहात. भिंतीलाच फळ्या अडकविलेल्या होत्या. त्यावर ते दोघेही बसले होते. दोघांच्या मधोमध एक लहानसं टेबल असून, त्यावर विजेचा दिवा लावलेला होता. दिव्याच्या मागं चकचकीत शेड असल्यानं, दिव्याचा प्रकाश परावर्तित होऊन, विजेप्रमाणं चमकत होता. कोरड्या वाऱ्याच्या झुळूकसरशीं टेबलावरचे कागद सळसळले, व पेन्सिल टेबलावरच्या एका कागदावर घरंगळत गेली. त्या कागदावर, सर्वत्र बारीक बारीक चौकोन आंखलेले असून, तो समुद्राचा नकाशा होता. आतांच शत्रूची विनाशिका, आठ नंबरच्या चौकोनांत दिसली–अशी कमांडरला बातमी मिळाली होती. त्यानं मान हलविली.

त्याबरोबर, ताबडतोब, तोफांच्या तोंडांतून, लालभडक अशी डोळे दिपवून टाकणारी ज्वाळा, उफाळली; धडाडधूम! तोफांतून एका मागोमाग तीन गोळे सुटले! समुद्र आणि कडा हादरून गेला, व एकदम कानठळ्या बसतील, असा प्रचंड आवाज झाला! संगमरवरी फरशीवरून, लोखंडी गोळे गडगडत जावे, त्याप्रमाणं, एका मागोमाग तीन तोफगोळे सुटले! थोड्या वेळानं, समुद्रावरून जो प्रतिध्वनि एकूं आला, त्यावरून ते फुटले, हे स्पष्टच झालं.

कमांडंट व कमिसार, शांतपणं एकमेकांकडे पहात होते. आतां सर्व कांही होऊन चुकलं होतं. बोलण्याची कांही जरूरीच राहिली नव्हती. बेटाला वेढा पडला होता, दळणवळणाचे मार्ग तोडून टाकण्यांत आले होते. त्या बेटावरील

किल्ल्यांतील मूठभर शिपाई, समुद्रावरून व आकाशांतून. सतत चालू असलेल्या माऱ्याला तोंड देऊन, आज महिनाभर किल्ल्याचं संरक्षण करीत होते; कड्यावर, सतत बॉंबचा पाऊस पडत होता; पाणतीर फेंकणारीं, व हल्ला चढविणारीं शत्रूचीं जहाजं, बेटाच्या सभोंवार, वळवळत होतीं. बेटावर जबरदस्त मारा करून, मग हल्ला चढवून बेट काबीज करायचं, असा शत्रूनं निश्चय केला होता. पण किल्ल्याचे वज्रकठोर तट अजून अभंग राहिले होते. तोफांच्या भडिमारापुढं शत्रूला मागं हटायला लागलं, त्यानं पुनः सैन्याची जमवाजमव केली, पवित्रा बदलला व पुनः निकराचा हल्ला चढविला. किल्ल्याची कमकुवत बाजू सांपडेल. अशा आशेनें त्यानं हल्ल्यावर हल्ले, चढविले, पण सर्व निष्फळ ठरले.

अशा तऱ्हेनं दिवस जात होते.

दारूगोळा व अन्न दिवसेंदिवस कमी होत चाललं. कमांडंट आणि कमिसार, समोर, सांठ्याची यादी ओढून, तासनतास विचार करीत बसत. त्यांनी, सांठा पुरविण्याचे आटोकाट प्रयत्न करून पाहिले; रोज प्रत्येकाला देण्यांत येणारं अन्न कमी करून पाहिलं; शेवटची भयानक घटका टाळण्यासाठीं, हजार खटपटी केल्या; पण त्यांचा नाइलाज झाला; अखेरी येऊन ठेपली.

" बरं, मग ? " कमिसारनं. शेवटीं विचारलं.

" एवढंच ! हेंच शेवटचं !" कमांडंट म्हणाला.

" तसं असेल, तर लिहून ठेवा. "

कमांडंटनं सावकाश, लॉगबुक उघडलं, घड्याळाकडे नजर फेंकली, व वळणदार अक्षरांत लिहायला सुरवात केली.

" आज पहांटपासून, साऱ्या तोफा भडिमार करीत आहेत. संध्याकाळी पावणेसहा वाजतां, आम्हीं तोफगोळा उडविला तो शेवटचा. आमच्या जवळचा दारुगोळा संपला आहे. एक दिवस पुरेल, इतका अन्नाचा सांठा शिल्लक आहे."

त्यानं लॉग बुक मिटलं. तें जाडजूड दोऱ्यांनी बांधलेलं, व सीलबंद होतं. जणूं त्याचं वजन अजमावण्यासाठीं म्हणून; त्यानं ते क्षणभर तसंच धरून ठेवलं, व नंतर शेल्फवर ठेवलं.

" कमिसार, असं आहे हे. " तो गंभीरपणं म्हणाला. इतक्यांत, कुणी तरी दारावर थाप मारली.

" आंत या. "

ड्यूटीवर असलेला ऑफिसर आंत आला. त्यांच्या आंगातील कपड्यांवरून पावसाचे थेंब ओघळत होते. त्यानं, एक लहानसं ॲल्युमिनियमचं नळकंडं. टेबलावर ठेवलं.

" पेंद्रट ! "

" होय ! कॉमरेड कमांडंट. "

" हें कुणी टाकलं ? "

" एका लढाऊ जर्मन विमानानं. "

कमांडंटनं, त्यांचं झांकण. फिरवून काढलं, व आंत बोट घालून. कागदाची गुंडाळी बाहेर ओढून काढली: त्यानं कागदावरील मजकूर वाचला मात्र, त्याच्या मुद्रेवर संतापाची छटा उमटली. त्या कागदावर. ठळक अक्षरांत. निळ्या शाईनं खालील मजकूर लिहिलेला होता:

" सोवियत किल्ल्याचे व तोफखान्याचे...मिस्टर कमांडंट, तुमच्या वेटाला. चोहोंबाजूंनी वेढा पडला आहे. तुमच्यापाशीं दारू गोळ्याचा व धान्याचा साठा नाहीं. निरर्थक रक्तपात टाळावा, म्हणून तुम्हीं शरण यावें, असें मी सुचवितों. अटी:—किल्ल्यांतील सर्व शिबंदीनें, ( कमांडंट व अधिकारी यांसकट ) निःशस्त्र होऊन चर्चनजीकच्या चौकांत जमून शरण आलें पाहिजे. किल्ल्यांतील तोफखाना. मोडतोड न करीतां, आहे तसा, शाबूत ठेवला पाहिजे. पहाटे सहा वाजतां ( मिडल युरोपियन टाईम ) चर्चवर पांढरा झेंडा फडकला पाहिजे. या अटींवर मी तुम्हांस जीवदान देण्याचं वचन देतों. नाहींपेक्षा—मरण पत्करा. शरण या. "

**—रिअर ॲडमिरल फॉन एव्हरशार्प—**

**जर्मन आरमारी काफिल्याचा प्रमुख.**

कमांडंटनं शरणागतीच्या अटीचा कागद, कमिसरच्या हातीं दिला. कमिसरनं तो वाचला, व तो घेऊन येणाऱ्या सैनिकास, जाण्यास सांगितलं. त्याप्रमाणं तो खोलींतून बाहेर पडला.

खोलींत, आतां दोघेच राहिले होते. "असं. एकूण त्यांना चर्चवर पांढरा झेंडा हवा आहे." कमांडंट गंभीरपणं, उद्गारला.

"हं" कमिसार उत्तरला.

कमांडंट आंगावर ओव्हर कोट चढवीत म्हणाला. "अच्छा! दिसेल त्यांना पांढरा झेंडा! काय चर्चवर भला मोठा पांढरा झेंडा! कमिसार, तुम्हांला काय वाटतं, त्यांना हा झेंडा दिसेल? त्यांना तो चांगला स्वच्छपणं दिसला पाहिजे. अशी आपण व्यवस्था करायला हवी. झेंडा, चांगला लांबरुंद बनविला पाहिजे. पण वेळ आहे कां, आपल्याला एवढा मोठा झेंडा बनवायला?"

"भरपूर वेळ आहे," कमिसार हॅट शोधतां शोधतां म्हणाला. "आख्खी रात्र पडलीय्, झेंडा बनवायला. तसे आपण त्यांची खोटी करणार नाहीं. आपण ताबडतोब झेंडा तयार करूं. पोरं आपल्या मदतीला आहेतच. मी खात्रीनं सांगतों, कि आपला झेंडा भला मोठा होणार!"

कमांडंट व कमिसारनीं एकमेकांना, आलिंगन देऊन चुंबन घेतलं. तें आलिंगन म्हणजे मनापासून दिलेलं, मर्दाचं आलिंगन होतं. क्षणमात्र, कणखर असे रांकट ओंठ, एकमेकांवर टेकले गेले. जुन्या रशियन चालीप्रमाणं, एकमेकांचं चुंबन घेण्याचा हा त्यांच्या आयुष्यांतला पहिलाच प्रसंग! दोघेही गडबडींत होते; एकमेकांचा निरोप घेण्याची संधी, पुनः मिळणार नाहीं, अशी त्यांची खात्री होऊन चुकली होती.

कमिसार मेसरूममध्यें गेला. लाल मखमलीवर ठेवलेला, लेनिनचा अर्ध पुतळा, त्यानें चौथऱ्यावरून उचलला—व लाल मखमल घेतली. नंतर स्टुलावर चढून, भिंतीवर लाल कापडावर घोषणा लावल्या होत्या, तें लाल कापड काढलं.

रात्रभर, किल्ल्यांतील सर्व सैनिक झेंडा शिवण्यांत गुंतले होते. मेसरूमपेक्षां मोठा झेंडा झाला पाहिजे, असं त्यांनी ठरवलं होतं; खलाशांच्या सुया, व मिळेल तो धागा, यांनी झेंडा बनवायचं काम चाललं होतं.

पहांटपूर्वी झेंडा तयार झाला.

खलाशांनी व्यवस्थितपणं, नवे कपडे चढविले, ऑटोमॅटिक रायफली

गळयांत अडकविल्या, खिशांत दारूगोळा भरून घेतला व एकामागोमाग एक शिडीवरून वर आले.

पहाटच्या सुमारास, ऑर्डर्लीनं, फॉन एव्हरशार्पच्या कॅबिनचं दार वाजवलं. फॉन एव्हरशार्प झोंपला नसून, नखशिखान्त कपडे घालून. बिछान्यावर पडला होता. ताबडतोब तो उठला; ड्रेसिंग टेबलाजवळ जाऊन, त्यानं आरशांत, आपलं तोंड पाहिलं. व कोलन वॉटरनं डोळयाखालचा भाग पुसून काढला. एवढं सगळं झालं, तेव्हां त्यानं ऑर्डर्लीला आंत यायला परवानगी दिली. ऑर्डर्लीला, कसला तरी आनंद झालेला दिसत होता. मोठ्या शिकस्तीनं. त्यानं स्वतःला आवरलं, व हात उचलून सलाम ठोकला.

हातांतील खंजिराची हस्तिदंती मूठ गोंजारीत. फॉन एव्हरशार्पनं, करड्या आवाजांत विचारलं.

" चर्चवर झेंडा लागला आहे का ? "

" होय, ते शरण येत आहेत. "

" वा: छान ! फारच उत्तम बातमी आणलीस तूं ! छान ! सर्वांना डेकवर जमायला सांग. "

एक मिनीट झालं नसेल, तोंच फॉन एव्हरशार्प जहाजावरील. एका लहानशा पूलावर, पाय रूंदावून ऐटींत, उभा होता. वादळी. पावसाळी पहांट आतांच होत होती. फॉन एव्हरशार्पला दुर्बिणींतून, क्षितिजावरील लहानसं खडकाळ बेट दिसत होतं. बेटाभोंवतीं काळाभुरका दर्या खळाळत होता. तुटक्या किनाऱ्यावर लाटांचं, रानटी एकसुरी कंटाळवाणं संगीत, चालू होतं. समुद्र, जणुं कांही काळसर कातळांतून खोदून काढला आहे, असा भास होत होता.

पिछाडीला, मच्छीमारी खेडेगांवची वस्ती असून, त्यापुढं तिकोमी चर्च होतं. चर्चच्या मनोऱ्यावरील सुळक्यावर, काळाकुळकुळीत क्रूस असून, भुरकट आकाशांत, तो उठून दिसत होता. चर्चच्या मनोऱ्यावर. भला मोठा झेंडा फडफडत होता. पहांटच्या अंधुक प्रकाशांत तो काळाकुट्ट दिसत होता.

"चू चू ! अरेरे गरीब बिचारे ! एवढा मोठा झेंडा शिवायला, बिचाऱ्यांना अंगावरचे-उरले सुरले सर्व कपडे, बहुतेक फाडायला लागले असतील. पण त्याला नाईलाज आहे. शरण यायचं, म्हणजे गैरसोयी सहन केल्याच पाहिजेत."

त्यानं लगेच हुकूम सोडला.

त्यासरशीं, हल्ला चढविणाऱ्या लहान लहान बोटींचा काफला व टॉर्पेडो बोटी, वेगानं बेटाकडे चालूं लागल्या. बेट जसं जसं जवळ येऊं लागलं, तसं मोठं दिसायला लागलं. आतां दुर्बिणीशिवाय. चर्चजवळील चौकांत उभे असलेले मूठभर खलाशी. स्पष्ट दिसूं लागले.

इतक्यांत, सूर्याचं लाल भडक बिंब वर सरकूं लागलं. सूर्य, लाल रसरशीत चेंडू सारखा दिसत होता. आकाश व समुद्राचं पाणी, यामध्यें हवेंत जणूं तो तरंगत होता. त्याची वरील कड अंधुकशा ढगाआड झाली असून खालची कड. जेमतेम. समुद्राच्या उसळत्या पृष्ठभागावर टेकली होती. बेट, लालसर प्रकाशांत गुरफटलं असून. चर्चवरील झेंडा. उकळत्या लोखंडी रंगाप्रमाणं, लाल भडक दिसूं लागला.

"छे: ! काय सुंदर देखावा आहे पहा ! सूर्यानं पांढरा झेंड्याला लाल भडक रंग चढविलाय. पण थोड्याच वेळांत आम्ही तो पांढरा फटफटीत करून टाकूं."

वाऱ्यानं प्रचंड लाटा उसळत होत्या व धडाक्यानं खडकावर आपटत होत्या. लाटा खडकावर आपटल्या, किं ब्रॉंझप्रमाणं खणखणीत आवाज उमटे. तुषारानं ओलावलेल्या हवेंत. चांदीच्या घंटा घणघणाव्या, असा ध्वनि ऐकूं येई. लाटा उसळत, व खळाळत तोफगोळ्याच्या धूमधडाक्यासरशीं, एकदम मागं फेकल्या जाऊन, लालसर उकळत्या पाण्याचा जणूं कारंजा बने.

हल्ला चढविणाऱ्या लहान बोटी, किनाऱ्याला जाऊन लागल्या. दोन्ही हातांत, डोक्यावर बंदुकी धरून, छातीभर फेसाळपाण्यांतून. जर्मन शिपाई, या कातळावरून त्या कातळावर, असे उड्या मारीत, धडपडत. पडतझडत, पुन: तडफडून उठत...किल्ल्याच्या रोंखानं निघाले. आतां ते कड्यापर्यंत जाऊन पोंचले होते... आतां. ते तोफखान्याच्या कोठाराच्या दिशेनं, चालूं लागले होते.

फॉन एव्हरशार्प. होता तिथंच, पुलाचा लोखंडी कठडा घट्ट धरून उभा होता. त्याची नजर किनाऱ्यावर खिळून राहिली होती. बेटावर हल्ला चढविला जात आहे, हें दृश्य पाहून, त्याचा आनंद गगनांत मावेनासा झाला. त्याचे ओंठ आनंदातिशयानं नुसते थरथरत होते.

" पुढं व्हा ! माझ्या शिपायांनो पुढं व्हा ! "

इतक्यांत, जमिनीखालीं एक प्रचंड स्फोट झाला, व सबंध बेटच्याबेट हादरलं. तोफखान्याच्या कोठारांतून, रक्तानं माखलेल्या चिंध्या व प्रेतांचे तुकडे धाडकन् हवेंत उसळले. कडे हादरून दुभंगले, व त्यांचे तुकडे जे उडविले गेले. ते उडवून दिलेल्या तोफांच्या चक्काचुरांत जाऊन पडले.

एकदा धरणीकंप व्हावा तसं होऊन, बेट सारखं कंपायमान होत होतं.

" ते तोफा उडवून देत आहेत ! " फॉन एव्हरशार्प किंचाळला. " या चोरांनी, शरणागतीच्या अटी मोडल्या."

इतक्यांत सूर्य ढगाआड गेला, व थोड्या वेळानं दिसेनासा झाला. बेटावर व समुद्रावर पसरलेला लालसर प्रकाश विरून गेला. भोंवतालची प्रत्येक वस्तू. काळसर शिळेप्रमाणं दिसायला लागली......पण चर्चवरील झेंडा मात्र, लाल भडक दिसत होता. फॉन एव्हर शार्पला पायाखालची जमीन, गरगरां फिरूं लागलीय् किं काय, असा भास झाला. पदार्थ विज्ञान शास्त्राच्या, सर्व नियमांना धाब्यावर बसवून, चर्चवरील झेंडा लाल भडक राहिला होता. काळ्या पार्श्वभूमिवर, तर लाल झेंडा अधिकच खुलून दिसूं लागला. त्याच्याकडे पहावेना. आतां फॉन एव्हरशार्पला सर्व कांहीं कळून चुकलं. चर्चवरील झेंडा पांढरा नव्हताच मुळीं ! तो लालच होता ! लाल नाहीं तर दुसऱ्या कोणत्या रंगाचा असणार ! आपण कुणाशीं लढताहोंत, हे फॉन एव्हरशार्पसाहेब विसरले होते ! हा दृष्टिभ्रम नव्हता. सूर्यानं एव्हरशार्पला चकविलं नव्हतं, तर त्यानंच स्वतःला चकविलं होतं.

फॉन एव्हरशार्पच्या तोंडून नवा हुकूम कडाडला.

बॉंबर्स, लढाऊ विमानं, हल्ला चढविणारीं छोटीं विमानं, यांचा काफला

हवेंत उडाला. टॉर्पेडो बोटी, विनाशिका व चढाऊ बोटी चोहोंबाजूंनीं बेटावर चढाई करण्यासाठीं वेगानं सुटल्या. ओल्या खडकांवर सैनिकांचीं नवीं टोळकीं चढूं लागली. त्यांना बेटांवर उतरायचं होतं. भराभर, कोळयांच्या खेड्यांवर. फुलांप्रमाणं दिसणारे, छत्रीधारी सैनिक उतरूं लागले. एकसारख्या होणाऱ्या स्फोटामुळं कानठळ्या बसत होत्या. या धुमश्चक्रींत, चर्चजवळील चरांत, तीस सोवियत खलाशी, पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर, सर्व दिशांना, हातांतील रायफली व मशीनगन्स रोखून उभे होते. या अंतिम घटकेला, प्रत्येकजण देहभान विसरला होता, एकालाही स्वतःच्या प्राणाची पर्वा नव्हती. तो प्रश्नच निकालांत निघाला होता. आपल्यासमोर मृत्यू आ वासून, वाट पहात होता याची त्यांना जाणीव होती. पण मरतां, मरतां, जमेल तितक्या शत्रुसैनिकांचा धुव्वा उडवायचा, असा त्यांनीं कठोर निश्चय केला होता. लढणं हें त्याचं कर्तव्य असून, तें त्यांनीं शेवटच्या क्षणापर्यंत बजावलं.

त्यांना ज्या शत्रूशीं तोंड द्यायचं होतं, तो त्यांच्यापेक्षां किती तरी पटीनं सामर्थ्यवान होता. एका बाजूला मूठभर कडवे सोवियत खलाशी, तर दुसऱ्या बाजूला, प्रचंड सुसज्ज जर्मन सामर्थ्य !

चर्चच्या भिंतीवर डमडम गोळ्या लागल्यानं, विटा व चुना यांचा चुरा, त्यांच्या तोंडावर, उडाला होता. त्यांचीं तोंडं रक्तानं व घामान न्हालीं होतीं; अंगावरील कपड्यांच्या अस्तरांचे गोळे करून, ते आपल्या जखमा तात्पुरत्या बुजवीत होते. याप्रमाणं प्राणपणानं शेवटपर्यंत लढून, ते तीस शूर सोवियत खलाशी, एकामागोमाग एक पतन पावले.

त्यांच्यावर, खलाशांच्या दाभणांनीं व मिळेल त्या सुतळीनं शिवलेला, सांपडेल त्या लाल कापडाचा बनविलेला, लाल झेंडा फडफडत होता; प्रेमाची आठवण म्हणून, जतन करून ठेवलेले रेशमी लाल हातरुमाल, किरमीजी लोंकरी गळपट्टे, गुलाबी चंच्या, शेंदरी घोंगड्या व गंजीफ्रॉक हे एकमेकाला जोडून, तो अजस्त्र लाल झेंडा बनविला होता. “ यादवी युद्धाच्या इतिहासाच्या ”, पहिल्या भागाचं लालभडक कव्हर फाडून, कुईबिशेवच्या तरुणींनी, किल्ल्याला भेट म्हणून

पाठविलेल्या, लेनिन स्तालिनचे फोटो असलेलं रेशमी विणकाम, जोडून ही प्रचंड अग्निपताका बनविण्यांत आली होती.

अस्मानांत, अतिशय उंच अशा जागीं, पिस्कारलेल्या ढगांच्या संगतींत, तो लाल झेंडा, फडफडत होता, डोलत होता. दैदिप्यमान तेजानं तळपत होता. जणूं कांहीं, एकादा अदृश्य पण विराट ध्वजवाहक, रणधुमाळीच्या लोटांतून, त्याला रणोन्मादानं, विजयाकडे घेऊन जात होता !

